


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन










अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३० । अंक ३ । पावसाळा २०१२

# भाषा आणि जीवन




अनुक्रमणिका

**संपादक :** नीलिमा गुंडी
**संपादकीय-सल्लागार :** अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
**संपादन-समिती :** नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर
**संपादकीय पत्रव्यवहार :** नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनंद काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.
चलभाष : 094216 10704
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 093731 04093 **विजय पाध्ये** - 098220 31963. marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) वार्षिक वर्गणी

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| संस्था : | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान **₹ २,५००/-**, अर्धे पान **₹ १,५००/-**, पाव पान **₹ ८००/-**, शुभेच्छा **₹ ४००/-**, आवरण पृष्ठ तीन **₹ ३,०००/-** जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी).

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

## अनुक्रमणिका



---

**मुखपृष्ठाविषयी :**
मुखपृष्ठावरील ओळींचा संदर्भ : 'वृत्त', ग्रेस, ''सांध्यपर्वातील वैष्णवी'', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, आवृत्ती दुसरी. २००१, पृ० १३३

---

## अभिनंदन

डॉ० **नागनाथ कोत्तापल्ले** (माजी कुलगुरू, डॉ० बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ) यांची महाराष्ट्र 'राज्यशासनाच्या 'मराठी भाषा सल्लागार समिती'च्या अध्यक्षपदी नेमणूक झाल्याबद्दल परिषदेतर्फे त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

---

## परिषदेला देणगी

मराठी अभ्यास परिषदेला **श्री० पराग गं० जोगळेकर** यांनी **₹१०,०००**ची देणगी दिली आहे.

परिषद अशा भाषाप्रेमी उदार वाचकांची ऋणी आहे.

---

## महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार २०१२

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने इ०स० १९८३पासून महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने मराठीतील उत्तम भाषाविषयक लेखनाला दरवर्षी पुरस्कार दिला जातो. ₹५००० आणि गौरवपत्र असे या पुरस्काराचे स्वरूप आहे. कोणत्याही भाषेविषयीचा मराठी भाषेतील प्रकाशित ग्रंथ, कोश, अप्रकाशित संशोधनप्रबंध, संपादित लेखसंग्रह इत्यादी भाषाविषयक वैचारिक ग्रंथांचा ह्या पुरस्कारासाठी विचार केला जातो.

ह्या वर्षीच्या पुरस्कारासाठी इ०स० २०१० आणि २०११ ह्या दोन वर्षांतील पुस्तकांचा विचार केला जाणार आहे. तरी अशा ग्रंथांच्या लेखकांनी किंवा प्रकाशकांनी आपले ग्रंथ, परीक्षण-समितीच्या निमंत्रक विजया चौधरी, ई 503, राधिका सहकारी गृहरचना, पर्वतीनगर, सिंहगड रस्ता, पुणे 411 030 [ स्थिरभाष : (20) 2425 0559 ] ह्यांच्याकडे दि० २५ ऑगस्ट २०१२पर्यंत पाठवावे.





अनुक्रमणिका

संपादकीय

# अभिव्यक्तीच्या नव्या वाटा...

आनंद काटीकर

कोणतेही साहित्य हे विविध माध्यमांच्या आधारे फुललेले, प्रसृत झालेले असते. मराठी साहित्यही त्याला अपवाद नाही. मराठीतील लोकसाहित्याची परंपरा, प्राचीन लिखित साहित्याबरोबर तितक्याच समर्थपणे महाराष्ट्राच्या विशाल पटावर विकसित झालेली आहे. पूर्वी फारशी साक्षरता नव्हती, लिखाणाची सोय नव्हती. त्यामुळे हे वाङ्मय मौखिक परंपरेतून प्रसृत झाले, त्यात बदल होते गेले, वेगवेगळ्या व्यक्तींनी आपली प्रतिभा वापरून त्यातील कथाकाव्यात लक्षणीय भरही टाकली. कालौघात काही साहित्य टिकले, तर काही विस्मरणात गेले.

पुढे लिखाणाच्या सोयी, साक्षरता, संगणकावर आधारित प्रगत अंकीय तंत्रज्ञानाचा प्रसार यामुळे हळूहळू साहित्याच्या स्वरूपात आमूलाग्र बदल होऊ लागले. हस्तलिखित साहित्याची जागा मुद्रित साहित्याने घेतली. त्या मुद्रणाच्या हजारो प्रती तयार झाल्याने साहित्याचा प्रसार वेगाने व्हायला लागला. सुशिक्षित समाजात साहित्याविषयी चर्चा झडू लागल्या, या चर्चेतून मते, विचारधारा विकसित होऊ लागल्या. मासिके, पाक्षिके, साप्ताहिके, दैनिके असे विविध आविष्कार उदयास आले. तंत्रज्ञानाच्या प्रसारानंतर नभोवाणी आणि दूरचित्रवाणी ही माध्यमे आली आणि पाहता पाहता लिखित आणि मुद्रित साहित्याची जागा श्राव्य किंवा दृक्‌श्राव्य सादरीकरणाने घ्यायला सुरुवात केली. 'कानामागून आली आणि तिखट झाली' या म्हणीप्रमाणे या माध्यमांनी आज लिखित किंवा मुद्रित माध्यमाला मागे टाकले आहे की काय, अशी परिस्थिती निर्माण झाली आहे. विविध सर्वेक्षणांनुसार श्राव्य - खरे तर दृक्‌श्राव्य - माध्यमांनी छापील आणि अन्य साहित्यप्रकारांना चिंता वाटावी अशी परिस्थिती निर्माण केली आहे. विविध घरांमध्ये पुस्तकांची संख्या रोडावते आहे आणि दूरचित्रवाणीसाठी होणारा खर्च मात्र प्रसंगी वाढतोच आहे. (एलसीडी/एलईडी, टीव्ही, 'डीटीएच' इत्यादींची विविध पॅकेजेस यांचा खर्च विचारात घेतला तर मराठी मध्यमवर्गीय घर साधारणपणे दरमहा किमान ४०० रुपये खर्च त्या दृक्‌श्राव्य माध्यमासाठी करते आहे.)

पण... 'चार दिवस सासूचे' हेसुद्धा तितकेच सत्य आहे. संगणक आणि महाजाल यांची वेगाने होणारी वाढ पाहिली तर पुन्हा एकदा लिखित (पण हस्तलिखित नाही तर हस्तटंकित) आणि छापील (पण कागदावर छापलेली नाही तर संगणकाच्या पडद्यावर

छापलेली) अशा साहित्याची झपाट्याने वाढ होते आहे. केवळ ई-पत्र एवढ्यावरच न थांबता विविध विषयांना वाहिलेली संकेतस्थळे, विविध अनुदिनी, विविध वृत्तपत्रे यांनी महाजालावर आता मराठीचे आणि पर्यायाने मराठी माणसाचे स्थान सिद्ध केले आहे.

सुरुवातीच्या काळात मराठीची देवनागरी लिपी महाजालावर सहज उपलब्ध नसल्यामुळे रोमी (रोमन) लिपीचा वापर करत मराठी लिहिण्याशिवाय पर्याय नव्हता. त्यामुळे प्रारंभी असे रोमी लिपीतील मराठी लेखन वाचण्याची सवय संगणकीय मंडळींनी लावून घेतली होती. पुण्यातील म०ना० गोगटे यांनी या मुद्रणसौकर्यासाठीच मराठी भाषा रोमी लिपीतून लिहावी, अशी भूमिका मांडलेली होती/आहे. पण कालांतराने, बहुधा (मायबोली डॉट कॉम)ने सर्वप्रथम देवनागरी लिपीतून लेखनाची परंपरा (१९९८पासून) महाजालावर निर्माण केली. 'लोकमत' या वृत्तपत्राने मराठी अंक महाजालावर आणण्यात बाजी मारली; तर ई-सकाळ' हे युनिकोडमध्ये मुद्रित झालेले पहिले वृत्तपत्र महाजालावर फडकले.

१९९०नंतर अनेक उच्चशिक्षित मराठी संगणकतज्ज्ञ परदेशांत म्हणजे मुख्यत: अमेरिकेत गेले आणि त्यांनी आपल्या भाषाप्रेमातून मराठी भाषेची संकेतस्थळे निर्माण व्हावी, यासाठी प्रयत्न केले. त्यातून मायबोली, मनोगत, उपक्रम, मिसळपाव, माझे शब्द, मी मराठी, ऐसी अक्षरे, महाराष्ट्र माझा इत्यादी इत्यादी संकेतस्थळे निर्माण झाली, जोरात चालली, रडतखडत चालली, बंद झाली, पुन्हा सुरू झाली वगैरे वगैरे बरेच काही घडले. पण मुख्यत: या विविध संकेतस्थळांनी मराठी भाषकांना लिहिते केले. आपण कुठेही असलो, कोणत्याही स्वरूपाचे काम करत असलो तरीदेखील आपल्या भावना, आपले अनुभव शब्दबद्ध करून सर्वांपर्यंत पोहोचवले पाहिजे असे वाटणाऱ्या सर्वांना उपरोल्लिखित संकेतस्थळांनी हात दिला. परिणामी मराठीतून संगणकीय व्यवहार वाढू लागला. विविध फॉंट - शिवाजी, लोकसत्ता, आकृती, बरहा इ० (बरेचसे विनाशुल्क तर काही विकत) मिळू लागले आणि आता तर युनिकोडची सुविधा सर्वत्र उपलब्ध झाल्याने मराठी माणसे मोठ्या प्रमाणात संगणकावर मराठीत लिहू लागली - वाचू लागली - प्रतिसाद देऊ लागली - नवनवीन मराठी प्रतिशब्द (उदा० Scrapbook = खरडवही) निर्माण करू लागली. यातूनच मग पुढे, वाचकाला सर्व काही एकाच थाळीत न देता विशिष्ट विषयावर आधारलेली - ट्रेकिंग, आरोग्य, पर्यटन इ०इ० वेगवेगळी संकेतस्थळे निर्माण होऊ लागली. त्यातून जुन्या मराठी गाण्यांना आळवणारे आठवणीतली गाणी (www.aathavanitli-gani.com) किंवा मराठी माती (www.marathimati.com), गणपतीला वाहिलेले एकमेव (www.ekmev.com) अवकाशावर आधारित अवकाशवेध (www.avakashvedh.com) किंवा मराठीतून शुभेच्छापत्रे पाठवणारे मराठीवर्ल्ड (www.marathiworld.com) आणि वन स्मार्ट

क्लिक (www.onesmartclick.com) तर मराठी चित्रपटांना वाहिलेले मराठी मूव्ही वर्ल्ड (www.marathimovieworld.com) अशी ही यादी खूप लांबवता येईल.

संत तुकारामांची संपूर्ण अभंगगाथा इंटरनेटवर (www.tukaram.com) उपलब्ध आहे. तुकारामांचे तब्बल साडेचार हजार अभंग या संकेतस्थळावर मराठीसह अन्य भाषांमध्ये वाचायला मिळतात. 'ज्ञानेश्वरी' मूळ स्वरूपात इंटरनेटवर नसली, तरी 'कॉमन मॅन्स गीता' या मथळ्याखाली ज्ञानेश्वरीच्या सर्वच्या सर्व म्हणजे १८ अध्यायांचे निरूपणही उपलब्ध झाले आहे. www.chhatrapati-shivaji.com या संकेतस्थळावर स्वराज्याची स्थापना करणाऱ्या शिवाजी महाराजांचा परिचय आहे; तर सावरकरांचे स्मरण करणारे www.savarkar.org देखील भरपूर जण पाहताना दिसतात. शाहिरी वाङ्मयाचा परिचय करून देणारे संकेतस्थळ www.powade.com दिसते, तर श्रेष्ठ साहित्यिकांना समर्पित असणाऱ्या संकेतस्थळांमध्ये ग०दि० माडगूळकरांवरील www.gadima.com, कुसुमाग्रजांच्या काव्यावरील www.kusumavali.com, पु०ल० देशपांडे यांच्यावरील www.puladeshpande.net ही संकेतस्थळे निर्माण होऊन त्यांनी मोठ्या प्रमाणावर वाचकवर्ग/संवादकवर्ग निर्माण केला. दरम्यान काही शैक्षणिक संकेतस्थळेही निर्माण झाली. 'मराठी मित्र' हे संकेतस्थळ अमराठी माध्यमात शिकणाऱ्या मुलांना मराठी शिकवणारे म्हणून उत्तम प्रतिसाद मिळवताना दिसते. विविध संस्था, संघटना (यात राजकीय पक्षदेखील आहेत) यांचीही संकेतस्थळे निर्माण होत आहेत.

या संकेतस्थळांची लोकप्रियता वाढल्याने, त्यांना मोठा वाचकवर्ग लाभल्याने, त्यावर जाहिराती मिळू लागल्या. लोकही स्वतःहून जाहिराती देऊ लागले. म्हणजे या संकेतस्थळांच्या देखभालीचा खर्च निघण्याची दिशा दिसू लागली. म्हणजेच मराठी संकेतस्थळे आता फक्त चर्चापीठ अशा मर्यादेत न राहता ऑनलाईन/मोबाईल बँकिंगच्या दृष्टीनेही त्यांचा प्रवास सुरू झाला आहे आणि याचा प्रारंभ केला आहे www.maanbindu.com (मानबिंदू) या संकेतस्थळाने. या संकेतस्थळावर आता नवीन मराठी अल्बम्स ऑनलाईन खरेदी करता येतात तर www.bookganga.com (बुकगंगा) या संकेतस्थळावर पुस्तके ऑनलाईन खरेदी करता येतात. www.pustak.com हे संकेतस्थळ म्हणजे तर मराठी पुस्तकांचे इंटरनेटवरील दुकानच आहे. एकूणच काय, आता मराठी संकेतस्थळेही आर्थिक व्यवहार करून नियमित अर्थप्राप्ती करू शकतात, अशी स्थिती निर्माण झाली आहे.

महाराष्ट्र शासनाने आपले सर्व व्यवहार जलदगतीने पूर्ण व्हावेत यासाठी www.maharashtra.gov.in हे संकेतस्थळ सुरू केले आहे. राज्य शासनाच्या सर्व सूचना, आदेश, निर्णय वगैरे मिळण्याची सोय या संकेतस्थळावर आहे.

www.msrtc.gov.in हे राज्य परिवहन महामंडळाचे संकेतस्थळ आपल्याला महाराष्ट्र एस०टी०च्या सर्व गाड्यांची माहिती देते.

उदयोन्मुख मराठी कवींच्या कवितांना आणि कथाकारांना कथांना, ललितलेखांना विशेष स्थान देण्यासाठी नेटाक्षरी, बालनेटाक्षरी साप्ताहिक अशा काही ई-संस्थांनी महाजालावर मराठी ललितलेख-कथा-कवितांची प्रकाशने केलेली दिसतात. (आणि दुर्दैवाने आजचे मराठी समीक्षक मात्र अशा प्रचंड साहित्याचा विचारही करू शकत नाहीत. म्हणजेच लोकसाहित्य जसे त्याच्या बोलक्या स्वरूपामुळे अजूनही अलक्षित राहिलेले दिसते. तसेच हे ई-साहित्यही आपल्या संगणकीय स्वरूपामुळे अस्पर्शित राहिलेले आहे.)

आता ऑक्सफर्डने तर आपले शब्दकोश आणि एनसायक्लोपीडिया ब्रिटानिकाने आपले विश्वकोशही ऑनलाईन उपलब्ध केले आहेत - त्या तुलनेने पाहता www.marathibhasha.com (मराठीभाषा.कॉम)ने मराठी पारिभाषिक शब्द उपलब्ध करून दिले आहेत, मराठी विश्वकोशाचे युनिकोडानुकूल खंड आता उपलब्ध होऊ लागले आहेत आणि मोल्सवर्थचा शब्दकोश ऑनलाईन व चकती रूपाने उपलब्ध आहे तर गूगलनेही विविध भारतीय भाषांचा एकत्रित शब्दकोश उपलब्ध करून देऊन आंतरभारतीचे स्वप्न सत्यात आणण्यासाठीची पायाभरणी केली आहे. अशा विविधांगी प्रयत्नांनी आपल्याला काही माहिती 'ई'पलब्ध होते आहे. त्याचबरोबर जगातली सर्व माहिती मुक्तपणे प्रसारित करण्याचे ध्येय असणारा विकिपीडिया हा मुक्त ज्ञानकोश आता मराठीतही उपलब्ध आहे. अर्थात मराठी भाषकांनी त्यावर खूप काम करण्याची आवश्यकता आहे. विकिपीडिआ अनेक दिवसांपासून मराठीतून सर्व क्षेत्रांची माहिती लिहू शकणाऱ्या लेखकांच्या प्रतीक्षेत आहे. अजून तरी या कामासाठी मराठी भाषकांचा हवा तसा प्रतिसाद मिळालेला नाही. तो मिळाला तर खऱ्या अर्थाने मराठी ज्ञानभाषा होण्याच्या दृष्टीने काही पावले पडू लागतील. पण जागतिकीकरणाच्या या रेट्यात मराठी भाषक येथे अजून तरी मागे आहेत हे खरेच!

आता मराठी संकेतस्थळांच्या बरोबरीनेच किंबहुना जास्त संख्येने विविध ब्लॉग्ज म्हणजे अनुदिनीही लिहिल्या जात आहेत. आणि त्यातून अनेक विचारवंत, लेखक, अभिनेते, खेळाडू, राजकीय नेते आणि तुमच्या आमच्यासारखी 'साधी माणसं'ही अनुदिनीलेखनासाठी पुढे सरसावली आहेत. या अनुदिनींनी अभिव्यक्तीच्या या नव्या वाटांना अजूनच नवी वळणे दिली आहेत. त्याविषयी पुन्हा कधीतरी.

■

# ‘भाषाच ही निकामी?’
## ग्रेस यांच्या काव्यभाषेने निर्माण केलेले प्रश्न

नीलिमा गुंडी

कविवर्य ग्रेस यांच्या निधनामुळे त्यांच्या कवितेकडे रसिकांचे आणि समीक्षकांचे नव्याने लक्ष वेधले गेले आहे. साठोत्तरी साहित्यविश्वात ‘संध्याकाळच्या कविता’ (१९६७) या संग्रहाच्या द्वारे ग्रेस यांनी पदार्पण केले. या संग्रहातील कवितांमुळे ग्रेस यांच्या कलादृष्टीची जी ओळख झाली, ती एक सौंदर्यवादी कवी या स्वरूपाची होती. त्या सुमारास ग्रेस, ना०धों० महानोर, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ या सर्वांचीच काव्यक्षेत्रात नव्याने ओळख होत होती. महानोरांचा पिंडही सौंदर्यवादी वृत्तीचा असला तरी ग्रेस आणि महानोर यांच्या कलावंत व्यक्तिमत्त्वात बरेच अंतर होते. सुर्वे व ढसाळ यांच्या कवितांमुळे त्या सुमारास मराठी काव्याच्या प्रवाहाला नवे वळण लागले. मराठी काव्यामध्ये सामाजिक जाणिवेच्या आशयवादी काव्याचा प्रवाह प्रस्थापित होत गेला. त्याला समीक्षकांची मान्यताही मिळाली. साहजिकच ‘रोमँटिक’ काव्याची सद्दी संपली. मात्र ग्रेस आपल्या पिंडधर्माशी इमान राखून सौंदर्यवादी धारणेच्या कविता लिहीत राहिले. त्यांचे ‘राजपुत्र आणि डार्लिंग’ (१९७४), ‘चंद्रमाधवीचे प्रदेश’ (१९७७), ‘सांध्यपर्वातील वैष्णवी’ (१९९५) आणि ‘सांजभयाच्या साजणी’ (२००६) या संग्रहांमधील कविता त्यांची ‘रोमँटिक मिस्टिक’ - ‘सौंदर्यवादी गूढवादी’ - अशीच ओळख करून देत राहिल्या. त्यांच्या कवितांचा नवोदित कवींवर मोठ्या प्रमाणावर प्रभावही पडत राहिला. या पार्श्वभूमीवर ग्रेस यांच्या काव्यभाषेने मराठी साहित्यविश्वासमोर उभे केलेले प्रश्न जाणून घेणे इतकाच या लेखाचा मर्यादित उद्देश आहे. ग्रेस यांची कविता रसिकांसाठी दुर्बोध राहिली. स्वतः ग्रेस यांना आपल्या कवितेसाठी आलेले ‘दुर्बोध’ हे विशेषण एकीकडे आवडले नसले तरी दुसरीकडे ते दुर्बोधतेला ‘रहस्यशरणाची दैवी लिपी’ असे म्हणत तिचे समर्थनच नव्हे, तर काहीसे उदात्तीकरणही करीत राहिले. कोणत्याही जातिवंत प्रतिभावंताला येणारा भाषेच्या मर्यादांचा अनुभव त्यांनाही आला. आपल्या अनुभवविश्वाची रसरशीत स्पंदने रसिकांपर्यंत पोहोचवताना साहजिकच त्यांनी भाषेतील अंत:स्तरांचा शोध घेतला. त्यांनी छंद-वृत्त, शब्दालंकार, ही बाह्यलय आणि भाषेतील अंत:संगीताची आंतरिक लय यांना काव्यात्म अनुभवाचे माध्यम म्हणून योजले. ग्रेस यांनी डॉ० अक्षयकुमार काळे यांना दिलेल्या विस्तृत मुलाखतीत स्वत:च्या काव्याविषयी

बरेच भाष्य केले आहे. सुरुवातीला एकांतात रमणारे ग्रेस अलीकडे काही वर्षे जाहीर कार्यक्रमांतून उपस्थिती लावत होते. त्यांनी आपल्या ललितलेखसंग्रहांतूनही आपली काव्यविषयक भूमिका, निर्मितिप्रक्रिया आदींविषयी लिहिले आहे. त्यांची कविता आणि त्यांचे काव्यविषयक चिंतन केंद्रस्थानी ठेवून ग्रेस यांच्या काव्यभाषेने मराठी साहित्यविश्वासमोर उभे केलेले प्रश्न जाणून घेता येतात.

ग्रेस यांच्या काही कविता रसिकांना सहज आकळतील अशा आहेत, याची सुरुवातीलाच नोंद घ्यायला हवी. उदाहरणार्थ 'संध्याकाळच्या कविता'च्या सुरुवातीला आलेल्या त्यांच्या पुढील ओळी :

''गाय जशी हंबरते
तसेच व्याकुळ व्हावे
बुडतां बुडतां सांजप्रवाही
अलगद भरूनी यावे''. तसेच
''ती गेली तेव्हा रिमझिम
पाऊस निनादत होता''

ही त्यांची कविताही रसिकांची काव्यार्थविषयक किमान अपेक्षा पूर्ण करते. 'कन्येची समजूत', 'हिवाळ्यातील क्लॅरिअनेट' या 'सांध्यपर्वातील कविता'ही येथे आठवतात. अशा आणखीही कविता आहेत. 'सांजभयाच्या साजणी'मध्ये तर त्यांनी 'माझी आई : सुमित्रा', 'ग्रेसची आई', 'रिल्केने दिलेले कानमंत्र', 'माझ्या काव्यसंग्रहाचे पहिले टिपण', 'कॉ० वर्धन', 'माझे शिक्षक : शिवरामपंत' अशा स्वत:च्या भावविश्वाचे स्वरूप जाणण्यासाठी व त्याचे उत्खनन करण्यासाठी दिशा देणाऱ्या कविता लिहिल्या आहेत. विशेषत:

''आई माझी मत्त वासना
संभोगाची भूल
क्रूर पशूच्या डोळ्यांमधल्या
करुणेचेही फूल''

या त्यांच्या ओळी वाचताना त्यांच्या अनुभवविश्वावर सावली धरणाऱ्या आईची प्रतिमा आजवरच्या मराठी काव्यपरंपरेच्या संदर्भात कशी असांकेतिक होती, हे लक्षात येते. याच संग्रहातील त्यांच्या 'दु:ख होऊ दे विराट', 'घाव', 'ओल', 'कवितेचा जन्म', 'कवितेचे देणे', अशा काही कविता वाचताना ग्रेस यांच्या कवितांचे सामर्थ्य जाणवते.

ग्रेस यांच्या कवितांचा चाहता वर्ग मोठ्या प्रमाणावर निर्माण झाला असला तरी त्या कवितांच्या आशयाविषयी त्यांचे चाहते अनेकदा मौनच पाळतात. कारण त्यांच्या अनेक कवितांमधील एखादी ओळ, एखादे कडवे यांचा अर्थ लागला तरी समग्र कवितेचा

अर्थ मराठी वाचकाला ज्या प्रकारे कविता जाणून घ्यायची सवय झाली आहे, त्याप्रकारे लागत नाही. ग्रेस यांच्या कवितांवर शैलीशास्त्रीय, चरित्रात्मक आदी पद्धतीने समीक्षा होऊनही ती कविता वाचकाच्या आवाक्यात संपूर्णपणे येत नाही. इथे असाही प्रश्न उपस्थित होतो की, आपल्या वाचकाची काव्यार्थाविषयीची अपेक्षा फार बालबोध पातळीवरची तर नाही ना?

वाचकांना आपल्या कवितेविषयी दिशादर्शन करणाऱ्या टीपा ग्रेस यांनी काही कवितांना दिल्या आहेत. त्या टीपा इंग्रजीत लिहिलेल्या आहेत. मात्र त्यामुळे काव्यगत अर्थावर फार प्रकाश पडतोच असे नाही. याचे कारण ग्रेस यांची काव्यभाषेविषयीची भूमिकाच वेगळी आहे. आपली विशुद्ध कवितेविषयीची संकल्पना ते पुढील शब्दांत स्पष्ट करतात, ''विशुद्ध कवितेचा मार्गच तर्काला तिलांजली देऊन तर्काच्या पलीकडून खुणावणाऱ्या नक्षत्रवाटांचा मागोवा घेत असतो; पण याचा अर्थ असा नव्हे की,... ही कविता तर्काच्या सहज कसोटीवर उतरतच नाही... विशुद्ध कवितेतून तर्काची अपेक्षा असतेच असते; पण तर्काची सुसंगती आणि विश्लेषण, वर्गीकरण यातून ती न अवतरता तार्किक एकात्मभावाने, लयतत्त्वांच्या द्वारे ती सुसंगती साधली जात असते आणि ही प्रक्रिया यांत्रिक नसते तर जीवशास्त्राच्या सेंद्रिय, जिवंत घटकांप्रमाणेच ती विकसित होत असते आणि फुलतही जाते.''[१]

ग्रेस यांच्या कवितेत भाषेची काव्यनिष्ठ व संगीताभिमुख पुनर्घटना साधण्याचा प्रयत्न दिसतो. पृथ्वी, शिखरिणी, मंदारमाला यांसारखी अक्षरगणवृत्ते व मात्रावृत्ते त्यांना यासाठी जवळची वाटतात. ते मुलाखतीत म्हणतात : ''नादमधुर शब्दांची संघटना (यमक, अनुप्रासादी शब्दालंकार) यांनी व्यक्त केलेल्या अनुभूतीला एका विशिष्ट टप्प्यावर शब्दांचे विसर्जन करून थेट विशुद्ध संवेदनांच्या मुळाशी नेले पाहिजे.'' ते पुढे म्हणतात, ''खऱ्या अर्थाने मला भाषेला माझ्या काव्याची 'मातृभाषा' करायचे असते. त्या वेळीच मी लिहू शकतो- ''वाऱ्याने हलते पान

तुझे सुनसान

हृदय गहिवरले''[२]

ग्रेस यांची 'सौंदर्यवादी गूढवादी' काव्यवृत्तीतून स्फुरलेली करुणा आणि अबोध हुरहूर ('रोमँटिक मेलांकली') यांचा प्रत्यय देणारी कविता, प्रसंगी भावार्थ समजला नाही तरी रसिकांना नादसंमोहनातून आवाहन करू शकते. त्यांच्या दुर्बोध समजल्या गेलेल्या कवितेलाही रसिकांची दाद मिळत गेली, ही वस्तुस्थिती अशा प्रकारे समजून घेता येते. कवितेची वीण - तिची संरचना - वेगवेगळ्या सूत्राने गुंफलेली असू शकते. तर्काचे गद्यप्राय सूत्र दूर सारले तरी संज्ञाप्रवाहाचे सूत्र, नादसंघटनेचे सूत्र, साहचर्याचे सूत्र, प्रतिमांचे सूत्र आणि स्वप्नसरणीचे सूत्र अशी वेगवेगळी सूत्रे काव्याच्या संरचनेमागे

कार्यरत असू शकतात. कवीच्या केवळ जाणिवेच्याच नव्हे, तर अर्धजाणीव-नेणीव यांच्या डोहातील भावस्थितीचा भावप्रत्यय द्यायच्या प्रयत्नात ही सूत्रे प्रेरक असू शकतात. संवेदनांची लिपी घडवण्याची ही धडपड असू शकते. अर्थातच दूरान्वय, प्रतीक-प्रतिमांची संदिग्धता, असंबंधता, श्रुतयोजन, अतिवैयक्तिकता अशा अनेक कारणांमुळे कविता दुर्बोध राहत असते. मराठी कवितेला दुर्बोध कविता अपरिचित नाही. पण संतांची कूट रचना, पंडित कवींची पांडित्य प्रदर्शनातून आलेली क्लिष्ट रचना, केशवसुतांची गूढगुंजनपर कविता, मर्ढेकरांची नव कविता यांच्याशी तुलना करता या कवितेच्या दुर्बोधतेची जातकुळी वेगळी आहे. ग्रेस यांच्या कवितेने भाषेशी इतके स्वतंत्र, पृथगात्म नाते प्रस्थापित केले आहे की ती कविता अनुवादित करणेही कठीण व्हावे! या अर्थानेही ती 'अनुवंशविहीन' ठरते.

ग्रेस यांच्या कवितेला उखाणे घालण्याचा छंद आहे. हे उखाणे कवीच्या प्रश्नव्याकूळ मन:स्थितीची स्पंदने घेऊन येतात. त्यात कधी कूटप्रश्न असतात, उदा०

''सर्वांग जिरवून घेते त्या भाषेचे
नाव काय?
अर्धमागधीच्या करुणेवरची साय?''
तर कधी त्यात आर्त आळवणी असते, जशी-
''मनातून वाहणारी ही
युगांची आंधळी गाणी,
जरासे खोल बघताना
गळ्यातून शब्द का फुटतो?''

अशा उत्स्फूर्त आवेगपूर्णतेमुळे त्यांच्या काव्यात अवतरणक्षमता मोठ्या प्रमाणावर आढळते. (त्यांची अशी अवतरणे म्हणजे पारंपरिक स्वरूपाची सुभाषिते नाहीत!) त्यांची ही भाषिक लकबही त्यांच्या काव्याचे एक वैशिष्ट्य आहे.

महत्त्वाचे म्हणजे ग्रेस यांनी आस्वादकाला 'उपनिर्माता' मानले आहे. याचा अर्थ कवीची निर्मिती रसिक वाचकाच्या आस्वादातून पूर्ण होते, इतकेच नव्हे; तर आस्वादकही कवीच्या निर्मितीचा अर्थ जाणण्याच्या दिशेने स्वत: वाटचाल करतो. मात्र कवी ग्रेस यांचा इंग्रजी, हिंदी, मराठी साहित्याचा व्यासंग तसेच त्यांच्यावर प्रभाव असलेल्या रवींद्रनाथ टागोर, सूफी कवी, कबीर आणि रिल्के आदींच्या काव्यपरंपरा यामुळे त्यांच्यापाशी एक संपन्न असे कलावंत व्यक्तिमत्त्व होते. अशा कविमनाच्या निर्मितीतील व्यंग्यार्थ अनेकरंगी स्फटिकांचा असणे स्वाभाविक असते. त्याचे सौंदर्य जाणण्यासाठी केवळ संवेदनशीलता पुरेशी नसते, त्यासाठी कवीच्या 'अंतरंगसंचिता'शीही त्याचे किमान पातळीवर नाते असावे लागते. आता प्रश्न असा आहे की, आपल्या सांस्कृतिक

पर्यावरणात सर्वसामान्य रसिक हा 'उपनिर्माता' या पदावर अधिकार गाजवण्याची पात्रता प्राप्त करून घेऊ शकतो का? त्यासाठी आपल्या वाचनसंस्कृतीत सर्वसामान्य वाचकाचे रसिकात व त्यानंतर 'उपनिर्माता' या रूपात परिवर्तन होण्याची - त्याच्या विकासाची संधी उपलब्ध करण्याची - क्षमता आहे का? 'उपनिर्माता' होतानाची पथ्ये कोणती? कवीच्या वाटेवरूनच त्याने जायला हवे! तसे न करता जो तो आपल्या कल्पनेतील आभाळ कवीच्या शब्दांत पाहू लागला तर तशी मोकळीक द्यायची का? ग्रेस यांच्या चिंतनात या प्रश्नांच्या अंगाने केलेला विचार दिसत नसला तरी आपल्यापुढे हे प्रश्न यानिमित्ताने उभे राहतात.

आपल्याकडे काव्यनिर्मितिप्रक्रियेविषयी फारच कमी लेखन झाले आहे. त्यातही कविता कशी सुचली, हे सांगताना कवींचा कल त्या प्रसंगाची गोष्ट सांगण्याकडे राहिला आहे. एकीकडे काव्यनिर्मितीत डूब घेताना, दुसरीकडे स्वत:चेच जागरूक मन त्या निर्मितिप्रक्रियेवर पहारा करीत आहे, अशी कलात्मक अलिप्तता राखून लिहिलेले अनुभव मोठ्या प्रमाणात लिहिले जायला हवेत. त्याशिवाय दुर्बोधतेतील अस्सल दुर्बोधता आणि कृत्रिम/नकली दुर्बोधता पारखण्याचे निकष आपल्याकडे उपलब्ध असणार नाहीत.

ग्रेस यांनी मुक्तशैलीतूनही कविता लिहिल्या आहेत. तसेच द्विदल कविता, त्रिदल कविता अशा कविताही लिहिल्या आहेत. त्यात जाणीवपूर्वक प्रयोगशीलता असणार. त्यामुळे त्या कवितांमधील दुर्बोधतेचे स्वरूप त्यांच्या इतर कवितांच्या तुलनेत वेगळे आहे का, हाही शोध घ्यायला पाहिजे. ग्रेस यांनी पु०शि० रेगे यांच्याशी केलेला पत्रव्यवहार आपल्या मृत्यूनंतर सर्वांसाठी खुला करण्याचे लिहून ठेवले आहे. त्या पत्रांतून काही रहस्यांवर प्रकाश पडण्याची शक्यता आहे.

ग्रेस यांना एका संध्याकाळी आरती प्रभूंचे बोलणे ऐकताना पुढील ओळी सुचल्या होत्या :

''भाषाच ही निकामी शब्दास ही पुरेना
संवेदनाच द्यावी अर्थास काय पुन्हा''

काव्यांतर्गत भाषा ही व्यावहारिक भाषेतून घडवावी लागते, हे खरे. पण 'भाषाच ही निकामी' हे कितपत सत्य मानायचे; हा ग्रेस यांच्या कवितेने उभा केलेला प्रश्न आहे.

ग्रेस यांच्या काव्यभाषेच्या संदर्भात आणखी एक मुद्दा उपस्थित होतो. ग्रेस यांच्या काही कवितांना पं० हृदयनाथ मंगेशकर यांनी त्यातील काव्याचा आब राखून उत्तम चाली दिल्या. त्यामुळे त्यांच्या कवितांना मोठीच मान्यता मिळाली. 'घर थकलेले संन्यासी', 'पाऊस कधीचा पडतो', 'तू गेली तेव्हा रिमझिम', 'भय इथले संपत नाही' या त्यांच्या कवितांची सहज आठवण होते. दोन ललितकलांचा असा परस्परपूरक ठरण्याचा योग यानिमित्ताने आला. संगीताची ही साथ, 'भाषाच ही निकामी' या कवीच्या

म्हणण्याला पुष्टी देणारी मानण्यापेक्षा भाषेतील सुप्त स्पंदने जिवंत करणारी ठरली; असेच म्हणणे योग्य वाटते.

एकंदरीत ग्रेस यांच्या कवितेने मराठी समीक्षा-व्यवहारापुढे काव्यभाषेच्या संदर्भात प्रश्नांच्या स्वरूपात काही आव्हाने निर्माण केली आहेत. त्यांना वृत्तिगांभीर्याने भिडण्याची नितांत गरज आहे.

संदर्भ :

( १ ) 'हिमवंती संध्येचे गहिवर', 'मृगजळाचे बांधकाम', ग्रेस, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, २००३, पृ० ८८

( २ ) 'ग्रेस : मुलाखत', अक्षयकुमार काळे, 'ग्रंथमाला' खंड १, अंश १, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, १९८४ पृ० ११६-११७

■

## मुलांचा 'मानसिक विकास' मातृभाषेतूनच

आधुनिक शास्त्रदृष्ट्या मातृभाषा-शिक्षणाला खूप सखोल व व्यापक महत्त्व आहे, कारण त्या भक्कम पायावरच पुढील शालेय वा उच्च शिक्षणाची इमारत उभी राहावयाची असते. हा पाया भक्कम होताना शाळापूर्व वयात कोणत्या मानसिक क्रिया होतात हे समजून घेणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ, 'गाय' वा 'हम्मा' हा शब्द शिकताना गायीचे रंग-रूप डोळ्यांना दिसते, हंबरणे कानाला ऐकू येते, गायीला हात लावल्यास तिचा स्पर्श कळतो. तिच्या दुधाची चव जिभेला कळते. दुधाचा वासही नाकाला ओळखता येतो. अशा रीतीने पंचज्ञानेंद्रियांच्या संवेदना एकत्र येऊन गायीसंदर्भातील सर्व अनुभव मनात एकत्र 'संघटित' होऊ लागतात.

'गाय' या शब्दामागे नवनवे अनुभव एकत्र येऊन होणारा 'मानसिक विकास' मातृभाषेतूनच प्रथम होतो. हा भाषा शिक्षणाचा गाभा म्हणता येईल. सर्व वस्तू, प्राणी इत्यादिकांची 'नामे' अधिकाधिक 'अर्थपूर्ण' होत जातात. थोडक्यात वाक्ये तयार करताना होणारी भाषेची वेगवेगळी घडण परिचित होते. वापरण्याचा सराव होतो. परिसराचे आकलन आणि त्याबद्दलच्या अनुभवांचे एकत्रीकरण व प्रकटीकरण या समग्र जीवनात सततपणे चालू राहणाऱ्या भाषेच्या कार्याला टिकाऊ पाया मातृभाषेतच निर्माण होतो आणि तो ध्वनिरूप प्रतीकांच्या साहाय्याने होत असतो.

- प्रा० उमाकांत कामत, दै० 'लोकसत्ता', दि० ८ मे २०१२

# पुणे संस्कृत शब्दकोश : काल आज आणि उद्या

माधवी कोल्हटकर

संस्कृत आणि प्राच्यविद्या यांच्या जगतात पुण्याला अभिमान वाटावा असा पहिला महाप्रकल्प म्हणजे भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचा - महाभारताच्या संशोधित आवृत्तीचा प्रकल्प आणि त्यानंतर अर्थातच डेक्कन कॉलेज म्हणजे दक्षिणा महाविद्यालयाचा 'ऐतिहासिक तत्त्वावर आधारित विश्वकोशात्मक संस्कृत ( इंग्लिश ) शब्दकोश' (An Encyclopedic Dictionary of Sanskrit on Historical Principles) हा प्रकल्प होय. या कोशासंबंधात सर्वप्रथम विचारला जाणारा प्रश्न म्हणजे याचे raison d'etre. एवढा थोरला मोनियर विलियम्सचा कोश आहे, आपट्यांचा कोश आहे. मग आणखी तुमच्या कोशाची जरूरच काय? तेव्हा याबाबत आधी थोडे सांगायला हवे.

आज वेगवेगळ्या भाषांतल्या, वेगवेगळ्या प्रकारच्या वेगवेगळ्या विषयांवरच्या शब्दकोशांच्या बाबतीत इंग्रजीचा कदाचित प्रथम क्रमांक असेलही. पण त्या भाषेतही केवळ शब्दसंग्रह म्हणता येईल, असा थॉमस कूपर यांचा थिसॉरस उपलब्ध व्हायला जवळजवळ सोळावे शतक उजाडावे लागले. (नवनवे शब्द तयार करण्याचा आणि वापरण्याचा हव्यास असलेल्या शेक्सपिअरला तो उपलब्ध असावा असा अंदाज आहे.) पण संस्कृत शब्दांची अशी यादी देणारा पहिला ग्रंथ 'निघण्टु' याआधी किमान दोन हजार वर्षे उपलब्ध होता. बाहुल्याने प्रचारात असणारा पहिला एकभाषिक संस्कृत कोश म्हणजे अमरकोश. तोही साधारण इ० स० सहाव्या शतकातला. त्यानंतर तर आपल्याला संस्कृतमध्ये विपुल प्रमाणात आणि वेगवेगळ्या तऱ्हेने कोशनिर्मिती झालेली दिसते.

संस्कृतच्या बाबतीत पहिल्या द्विभाषिक कोशाची निर्मिती झाली. ती १६९९ ते १७३२ या काळात. जे०इ० हान्क्सलेडेन यांच्या या कोशाचे नाव होते 'Dictionarium Malabaricum Samserdamicum Lusitanum.' युरोपी भाषेतला संस्कृतचा हा पहिला कोश. नंतर पाओलिनोने त्यात सुधारणा केल्या. पण तो हस्तलिखित स्वरूपातच राहिला असावा. त्याविषयी अधिक माहिती मिळत नाही. त्यानंतर जवळजवळ शंभर वर्षांनी म्हणजे इ०स० १८१९मध्ये एच०एच० विल्सन यांनी 'डिक्शनरी, संस्कृत अँड इंग्लिश' हा अकारविल्हे कोश काही भारतीय पंडित आणि कोलब्रुक यांच्या साहाय्याने प्रसिद्ध केला. त्यानंतर बॉप, बेन्के, बुनॉर्फ यांचे कोश प्रसिद्ध झाले.

यानंतर प्रसिद्ध झालेला सर्वात महत्त्वाचा कोश म्हणजे ब्योथलिंक आणि रॉथ या दोन विद्वानांनी प्रसिद्ध केलेला 'सेंट पीटर्सबर्ग डिक्शनरी' या नावाने जास्त प्रसिद्ध असलेला संस्कृत-जर्मन शब्दकोश. याच्या सात खंडांची निर्मिती १८५५ ते १८७५ या वीस वर्षांतली. हे सात भाग 'ग्रेटर पीटर्सबर्ग डिक्शनरी' म्हणून ओळखले जातात. यातील वेदांचा सर्व तपशील रॉथ यांचा, उरलेला ब्योथलिंक यांचा. त्यानंतर १८७९ ते १८८९ या काळात ब्योथलिंक यांनी प्रसिद्ध केलेले सात भाग शॉर्टर पीटर्सबर्ग डिक्शनरी म्हणून ओळखले जातात. ग्रेटर डिक्शनरीच्या काळी उपलब्ध नसलेल्या पुस्तकांतल्या शब्दांची भर घालून आणि असलेल्या मजकुरात आवश्यक तिथे सुधारणा करून हे सात भाग काढलेले होते. त्यानंतर १९२४ ते १०२८ या काळात श्मिट यांनी हे सगळे खंड आणखी उपलब्ध झालेल्या सामग्रीच्या साहाय्याने अद्ययावत केले आणि आवश्यक तिथे सुधारणा केल्या. हा खंड नाक्खट्रेगे या नावाने प्रसिद्ध आहे.

या कोशात संस्कृत शब्दांचा प्रथम जर्मन अर्थ देऊन नंतर वैदिक साहित्यातील संबद्ध उद्धरणे प्राचुर्याने दिलेली आहेत. त्यानंतर रामायण-महाभारत या महाकाव्यात त्या शब्दांचा असलेला अर्थ आणि संबद्ध उद्धारणे येतात आणि मग अभिजात संस्कृत वाङ्मयातील अर्थ आणि उद्धरणे. यातील नोंदी अतिशय काळजीपूर्वक केलेल्या आहेत. एखादा शब्द हा सामासिक शब्दातील पहिला घटक नसेल, दुसरा, तिसरा किंवा त्यानंतरचा असेल तरी त्याची नोंद यात अकारविल्हे केलेली आहे. नञ् समासात आलेल्या दुसऱ्या घटकाचीही त्याच्या आद्याक्षरानुसार वेगळी नोंद केलेली आहे. संस्कृत धातू देताना त्यांचे विकरण लागून होणारे रूप दिलेले आहे. उदा० 'गम'चे 'गच्छ', 'पा'चे 'पिब','स्था'चे तिष्ठ इ० तसेच मूळ क्रियापदाचे अर्थ आणि उद्धरणे प्रथम देऊन त्याच्याच पुढे त्या क्रियापदाआधी येणारे उपसर्ग अकारविल्हे देऊन सोपसर्ग क्रियापदांचे अर्थ व उद्धरणे दिलेली आहेत. मुद्दाम ठरवून केलेला नसला तरी संस्कृत भाषेचा[१] ऐतिहासिक तत्त्वांवर बनलेला हा पहिला पद्धतशीर कोश म्हटला पाहिजे.

यानंतरच्या महत्त्वाच्या दोन कोशांपैकी मोनियर विलियम्स यांचा १८७२ साली प्रकाशित झालेला 'संस्कृत-इंग्लिश डिक्शनरी' हा पहिला कोश. या कोशात वापरलेली पद्धती ही जरी सर्वस्वी मोनियर विलियम्स यांची असली तरी तो बऱ्याच अंशी 'सेंट पीटर्सबर्ग डिक्शनरी'वरून बेतलेला आहे. त्यात नवीन माहिती घालून तिची सुधारित आवृत्ती काढली ती लॉयमान आणि कापेलर यांनी. १३३३ पानांची ही आवृत्ती इ०स० १८९९मध्ये प्रसिद्ध झाली.

दुसरा महत्त्वाचा, नाव घेण्यासारखा कोश म्हणजे ह्या पुण्यातलाच आणि त्यातही डेक्कन कॉलेजमध्येच शिक्षण झालेल्या वा०शि० आपटे यांचा. त्याचे नाव आहे, 'प्रॅक्टिकल संस्कृत-इंग्लिश डिक्शनरी'. इ०स० १८९०मध्ये प्रसिद्ध झालेल्या या कोशाने

संस्कृताभ्यासकांच्या मनात अढळ स्थान प्राप्त केलेले आहे. आधीच्या कोशात असलेल्या अभिजात संस्कृतातील शब्दसंपत्तीची अनुपस्थिती या कोशाने पूर्णांशाने भरून काढलेली आहे आणि विद्यार्थ्यांना परिपूर्ण तरीही स्वस्त असा कोश उपलब्ध करून दिलेला आहे. त्यांनी आपल्या प्रस्तावनेत या क्षेत्रातल्या पूर्वसूरींचा कृतज्ञतापूर्वक ऋणनिर्देश केलेला आहे. ज्या ज्या ठिकाणी ब्योथलिंक-रॉथ यांनी उद्धरणे दिलेली आहेत, तिथे ती त्यांनी पुनरुद्धृत केलेली नाहीत. पण जिथे नाइलाजच झाला, त्यांच्या सात-आठ वर्षांच्या संग्रहात मिळालीच नाहीत, तिथे मात्र त्यांनी त्यांचा आधार घेतला. त्यांच्या या कोशामध्ये विश्वासार्ह, वैविध्यपूर्ण आणि व्यावहारिक दृष्ट्या उपयुक्त अशी सर्व माहिती देण्याचा स्पृहणीय प्रयत्न केलेला आहे. न्याय, वेदान्त, अलंकारशास्त्र, नाट्यशास्त्र, व्याकरण अशा अनेक विद्याशाखांमधल्या तांत्रिक आणि पारिभाषिक शब्दांची माहिती यात उद्धरणांसह दिलेली आहे. तसेच लक्षणीय वाक्प्रचार, म्हणी इत्यादींची माहितीही त्या त्या शब्दांखाली दिलेली आहे. अग्नि, अगस्त्य, इंद्र अशांसारख्या नोंदींमध्ये त्यांच्याविषयीच्या आख्यायिकाही थोडक्यात; पण नेमकेपणाने दिलेल्या आहेत. अतिथी, अपत्य, जाया, हृषीकेश अशांसारख्या महत्त्वाच्या शब्दांच्या व्युत्पत्तीही दिलेल्या आहेत. ह्या बाबतीत त्यांच्यावर तारानाथ तर्क वाचस्पती यांच्या 'वाचस्पत्य' या ग्रंथाचा जबरदस्त प्रभाव दिसून येतो. तसेच यात संस्कृतमधल्या म्हणी म्हणजे न्याय दिलेले आहेत. पाणिनीच्या व्याकरणाचे नियम दिलेले आहेत. याखेरीज संस्कृत छंद:शास्त्र, काही महत्त्वाच्या संस्कृत ग्रंथकारांची माहिती आणि प्राचीन ग्रंथांत येणाऱ्या स्थलनामांचे आधुनिक भारताच्या नकाशातील स्थान या विषयांवरची तीन परिशिष्टे अतिशय मोलाची आहेत. यामुळेच संस्कृत भाषेसंबंधीचा हा पहिला विश्वकोशात्मक शब्दकोश म्हटला पाहिजे. ३६ वर्षांच्या अल्पायुष्यातले त्यांचे हे अनमोल योगदान खरोखरी नेत्रदीपकच म्हटले पाहिजे. आज जगभर हा शब्दकोश अनेक संस्कृताभ्यासक खरोखरीच वापरताना दिसतात.

मोनियर विलियम्स यांच्या या शब्दकोशात ५१५ पुस्तकांतल्या शब्दांचा समावेश आहे, तर आपट्यांच्या कोशात २२५ पुस्तकांतल्या शब्दांचा. ब्योथलिंक-रॉथ यांच्या कोशातल्या पुस्तकांची संख्या तर ५१५पेक्षाही थोडी कमीच आहे. अनेक शब्द तर त्यांनी हस्तलिखितांतून घेतले आहेत.

या कोशांच्या प्रकाशनानंतर अनेक संस्कृत ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. भासाची नाटके, कौटिल्याचे अर्थशास्त्र, वेदातील सामवेदाचे जैमिनीय ब्राह्मण ही त्यातली काही ठळक उदाहरणे. भारत, युरोप, अमेरिका सगळीकडेच नवनवीन ग्रंथ प्रकाशित होत होते, तर दुसरीकडे जपान आणि चीन इथे चिनी आणि तिबेटी भाषांत पूर्वी अनुवाद झालेल्या ग्रंथांचे त्या अनुवादांवरून पुन्हा संस्कृतीकरण सुरू झाले होते. चिनी तुर्कस्तानात वाळूत गाडली गेलेली ग्रंथसंपदा बाहेर येत होती. त्यातही संस्कृत ग्रंथांची संख्या बरीच मोठी

होती. अमेरिकन अभ्यासक फ्रँकलिन एजर्टन यांना तर या गोष्टींचे इतके महत्त्व वाटले की त्यांनी हाती घेतलेले वैदिक पाठभेदांचे काम तसेच सोडून, आपणच बारसे केलेल्या बुद्धिस्ट हायब्रीड संस्कृतचे काम हाती घेतले; आणि त्याचे व्याकरण लिहून आणि कोश तयार करून ते पुरेही केले. या संस्कृत भाषेने मूळ संस्कृत तयार ग्रंथसंपदेत कितीतरी प्रकारची भर घातली आहे.

फक्त नवीन ग्रंथच प्रकाशात येऊन थांबले नाहीत, तर जुन्या ग्रंथांच्या विविध हस्तलिखितांच्या साहाय्याने नवीन, सुधारित, संशोधित आवृत्त्या निघत होत्या, अजूनही निघताहेत. अनुवाद झाले, होताहेत. या सगळ्या प्रचंड सामग्रीची कुठेतरी दखल घ्यायला हवी होती. नोंद व्हायला हवी होती.

याच वेळी काही द्रवीड ग्रंथही उजेडात आले, त्यांचे प्रकाशन झाले. इंडो-आर्यन भाषा, द्रवीड कुलातील भाषा, यावर मोठ्या प्रमाणावर संशोधन सुरू झाले. या संशोधनाच्या आयामातूनही संस्कृतचा पुनर्विचार होणे जरूर होते. संस्कृतला भारतात अतिशय मानाचे आणि वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. संपूर्ण भारताला, एवढेच नव्हे तर बृहत्तर भारताला जोडणारी ही भाषा केवळ भाषिकच नव्हे तर सांस्कृतिकही माध्यम आहे. तुर्कांचे इथे आक्रमण होण्याआधी संस्कृत हीच इथली लिंग्वा फ्रांका-सांस्कृतिक आणि धार्मिक भाषा होती. कला, वाङ्मय, शास्त्र, तत्त्वज्ञान अशा अनेक विषयांवरचे ज्ञान यात सामावलेले आहे. यासाठी संस्कृतने अनेक प्रांतिक भाषांकडून शब्द आत्मसात केलेले आहेत, त्यांची संस्कृतीही आपलीशी केली आहे. त्यामुळेच भाषिक दृष्ट्या तर अशा कोशाची आवश्यकता होतीच; पण सांस्कृतिक दृष्ट्याही ती आवश्यकता होती. कालक्रमानुसार अर्थाची विभागणी केलेला कोश उपलब्ध झाला तर - कालिदासाला कोणते शब्द माहीत होते? भवभूतीची शब्दसंपदा त्याच्यापेक्षा निराळी कशी होती? अमुक एक शब्द प्रथम केव्हा वापरला गेला? एखाद्या विशिष्ट भागात किंवा विशिष्ट कालखंडात एखादा विशिष्ट शब्द कोणत्या अर्थाने वापरला गेला होता? - या आणि अशांसारख्या अनेक प्रश्नांची आणि शंकांची उकल होणार होती.

ही निकड अतिशय प्रकर्षाने जाणवली ती डॉ० सुमित्र मंगेश कत्रे यांना. संस्कृत हा त्यांचा प्रेमाचा विषय होता खरा, पण त्यांचे पहिले प्रेम होते ते गणितावर.[२] त्यातला ट्रायपॉड घ्यायला ते केंब्रिजमध्ये डेरेदाखल झाले; पण पोस्टाच्या घोटाळ्यामुळे त्यांना सर राल्फ टर्नर यांच्याकडे संस्कृतच्या अभ्यासाठी नाव नोंदवावे लागले. पोस्टाचा हा घोटाळा संस्कृतच्या भवितव्याच्या दृष्टीने खऱ्या अर्थाने 'पौष्टिक' घोटाळा ठरला. परदेशातून यशस्वी होऊन परतल्यावर आणि काही काळ इतर ठिकाणी काम केल्यावर ते डेक्कन कॉलेजमध्ये रुजू झाले आणि इथेच त्यांच्या या कल्पनेने मूळ धरले. इ०स० १९४१मध्ये मुंबई विद्यापीठाच्या 'विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्स'मध्ये त्यांनी जाहीरपणे

या प्रकल्पाचा उच्चार केला. अशा कोशाची निकड आणि कार्यवाही याबद्दल आपली भूमिका मांडली. एवढेच नव्हे तर त्या दृष्टीने १९४२मध्ये पहिले सक्रिय पाऊलही टाकले, ते 'डिक्शनरी ऑफ इन्स्क्रिप्टिकल संस्कृत' या प्रकल्पाचा श्रीगणेशा करून. संस्कृताभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना थोडीफार तरी आर्थिक मदत उपलब्ध व्हावी, हाही त्यामागे एक हेतू होता. नंतर १९४६मध्ये शिक्षणखात्याच्या सूचनेवरून त्यांनी भारत सरकारकडे हा प्रकल्प सादर केला. त्यासाठी अनुदानाची मागणी केली. मग केंद्र सरकार आणि आणि त्या वेळचे मुंबई सरकार यांच्याकडून, तसेच बडोद्याचे महाराज गायकवाड यांच्याकडून मदत मिळाल्यावर तातुपरत्या कर्मचाऱ्यांनिशी त्यांनी कामाला सुरुवात केली. हळूहळू संपादकीय आणि प्रशासकीय कर्मचारी स्वतंत्रपणे नेमले आणि पुढच्या वीसेक वर्षात आपल्या अथक प्रयत्नांनी स्वयंपूर्ण स्वयंशासित अशा कोशविभागाची स्थापना केली.

डॉ० कत्रे हे खरोखरीच अतिशय द्रष्टे संशोधक होते. सुरुवातीला त्यांनी एकसष्ट शाखांतील साधारण दोन हजार ग्रंथ निवडले होते. या ग्रंथांवर वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या संस्थांमधून काम व्हावे, अशी त्यांची प्रथम इच्छा होती. तशी त्यांनी ती इ०स० १९४८मध्ये पॅरिसमध्ये भरलेल्या परिषदेत बोलूनही दाखवली होती. त्यासाठी प्रा० लुई रनू, प्रा० सुनीतिकुमार चटर्जी, म०म० पां०वा० काणे यांची समितीही नेमली होती; पण सरतेशेवटी ही जबाबदारी एकट्या डेक्कन कॉलेजवर आणि पर्यायाने कत्रेसरांवरच येऊन पडली, आणि ती त्यांनी उत्कृष्ट रीतीने निभावलीही. या प्रकल्पाच्या दृष्टीने उपयुक्त म्हणून त्यांनी अनेक कोशांच्या संपादनाचे काम अभ्यासकांना दिले. भारतभरातून वेगवेगळ्या ठिकाणांहून पारंपरिक शास्त्रशिक्षण घेतलेल्या शास्त्रीजींना सन्मानाने बोलावून नियुक्त केले. अद्ययावत संशोधनाची दखल घेतली जाईल, अशा रीतीने संशोधनाची पद्धती आणि शिस्त लावून दिली. ग्रंथालयात रोज जाणे, नियतकालिके नियमित बघणे, त्यात कोशाला उपयुक्त प्रकाशन असेल, एखाद्या शब्दावर काही काम झाले असेल तर त्याची एक पत्रिका किंवा चिठ्ठी बनवून ती त्या शब्दाखाली टाकणे यांसारख्या गोष्टी संपादकवर्गाने कराव्यात, असा आग्रह धरला. शक्य तेवढ्या कर्मचाऱ्यांनी भाषाशास्त्रातही पारंगत व्हावे यासाठी प्रोत्साहन दिले. शब्दांच्या पत्रिका बनवण्याचे काम सुरू केले. त्यावर शब्द, त्याचा संदर्भ, अर्थवाही उद्धरण आणि संभाव्य अर्थ यांच्या नोंदी व्हायला लागल्या. अशा शब्दपत्रिकांनी स्क्रिप्टोरियम सुसज्ज व्हायला लागले. संस्थेच्या अभ्यासकांचे आणि त्याबरोबर इतरांचेही संशोधन प्रसिद्ध करण्यासाठी नियतकालिक सुरू केले. संस्थेचा स्वतःचा छापखाना सुरू करण्याचीही त्यांची कल्पना होती; पण ती मात्र अपुरीच राहिली. त्यांच्या कारकीर्दीत सर्व ग्रंथातली उद्धरणे काढण्याचे काम पुरे झाले नव्हते म्हणून, नाहीतर माझी खात्री आहे की सर्व शब्दपत्रिकांचे अकारविल्हे एकत्रीकरण करण्याआधी त्यांनी प्रत्येक पुस्तकाची स्वतंत्र शब्दसूची प्रकाशित केली असती.

यानंतर प्रधान संपादकपदी आलेल्या डॉ० अमृत घाटगे यांनी कोशाच्या प्रकाशनाला लवकर सुरुवात होण्याच्या दृष्टीने काही महत्त्वाची पावले उचलली. पुस्तकांची संख्या प्रथम कमी करण्यात आली. आज कोशात समाविष्ट असलेल्या पुस्तकांचा नेमका आकडा आहे १४६४. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटापर्यंतचीच पुस्तके घ्यायचे ठरवले होते, त्याप्रमाणे कालक्रमानुसार शेवटचे पुस्तक आहे 'हास्यार्णव' (१८५०). पूर्वी ठरवलेल्या अनेक योजना बाजूला ठेवून संपादनाच्या कामाला जोरदार सुरुवात झाली. शब्दांच्या जाती ठरवण्यात आल्या त्या अशा - (१) क्रियापद, (२) नाम, (३) सर्वनाम, (४) संख्या, (५) विशेषण, (६) अव्यय, (७) निपात, (८) क्रियाविशेषण, (९) उपसर्ग आणि (१०) कर्मप्रवचनीय.

सामासिक शब्द निवडताना ते जास्तीत जास्त तीन घटकांपर्यंत असावेत; पण जर एखादी तांत्रिक किंवा पारिभाषिक संज्ञा असेल तर मात्र त्यापेक्षा जास्त घटक असले तरी चालतील, असे ठरले. शब्द देताना प्रथम देवनागरी आणि नंतर रोमन लिपीत दिला जाईल, रोमन लिपीत देताना शब्दाची अर्थानुसार फोड करून तीमध्ये रेष (डॅश) देऊन दाखवली जाईल, मग शब्दाचे व्याकरणानुसार वर्गीकरण करून पुढे अर्थ दिला जाईल आणि त्याला पूरक अशी उद्धरणे दिली जातील, असा साधारण आराखडा ठरला. ज्या ग्रंथांवर भाष्ये किंवा टीका उपलब्ध आहेत, त्यांची योग्य ती दखल घेऊन पूरक किंवा विरोधी म्हणून तीही देण्यात येतील. जर एखाद्या शब्दाच्या बऱ्याच पत्रिका असतील, त्या शब्दाची नोंद बरीच मोठी होणार असेल आणि त्यात येणाऱ्या अर्थांची संख्याही लक्षात घेण्यासारखी जास्त असेल तर त्या वेळी सुरुवातीला सर्व अर्थ नोंदवले जातील. क्रियापदाची किंवा नामाची उद्धरणे निवडताना शक्यतो सर्व रूपांना, आणि विभक्तींना प्रतिनिधित्व मिळेल, अशी दक्षता घेतली जाईल. यास्काचार्यांच्या विभागणीनुसार खरे तर संस्कृतात विशेषण हा वेगळा प्रवर्गच नाही. सगळी नामेच असतात. जेव्हा एका नामाबद्दल अधिक माहिती देणारा आणखी शब्द असेल तेव्हा तो विशेषण होईल: पाणिनी म्हणतात त्याप्रमाणे 'व्यावर्तकं विशेषणम्'. पण आमच्या कोशात मात्र लक्ष्य भाषेच्या सोयीसाठी विशेषण ही विभागणी मानून विशेष नाम नसेल तिथे adj. (used as noun) अशी नोंद करून मग उद्धरणे दिलेली आहेत. मोनियर विलियम्स किंवा ब्यॉथलिंक-रॉथ यांचा कोश बघताना ज्या ज्या त्रुटी जाणवतात त्या त्या शक्यतो दूर करून हा कोश जास्तीतजास्त उपयोक्ताभिमुख करण्याचा प्रयत्न केलेला आहे. आज या कोशात 'अपि'पर्यंतचे शब्द प्रकाशित झाले आहेत. मोनियर विलियम्स यांच्या कोशात पंचावन्न पृष्ठांमध्ये मावलेल्या या शब्दांनी या कोशाची ९ खंडांची ४८०८ पृष्ठे व्यापलेली आहेत, यावरून याचे महाकाय स्वरूप लक्षात येईल.

या कोशाचा १९४८पासून आजवरचा प्रवास अतिशय खडतर असा आहे.

प्रकल्पाच्या सततच्या तात्पुरत्या स्वरूपामुळे विभागातल्या कर्मचाऱ्यांना निर्वेधपणे काम करणे काही वेळा कठीण झाले आहे. आज हा कोश पुण्याचाच नव्हे; तर महाराष्ट्राचाही मानबिंदू ठरलेला आहे. इथून हा कोश हलवण्याची अनेकांची इच्छा आहे; पण ते अर्थातच कोणालाही शक्य होणार नाही. कारण माझी खात्री आहे की, तशीच वेळ आली तर सगळे पुणेकर एक होतील. हा कोश आणि त्याचे अमूल्य भांडवल म्हणजे स्क्रिप्टोरियम तो पुण्याबाहेर जाऊ देणार नाहीत. तसेच कोशनिर्मिती ही एक सतत चालणारी प्रक्रिया आहे. जेव्हा हा कोश पुरा होईल, तेव्हा त्यातून अनेक उपप्रकल्पांची निर्मिती होत राहील आणि त्या अर्थानेही हा कोशप्रकल्प कधीही बंद पडणार नाही.

**टिपा :**

(१) ऐतिहासिक तत्त्वावरील पहिला इंग्लिश-इंग्लिश कोश म्हणून बहुतेक चार्ल्स रिचर्डसन यांच्या १८३७मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'ए न्यू डिक्शनरी ऑफ इंग्लिश लँग्वेज' या द्विखण्डात्मक कोशाचा उल्लेख करावा लागेल. हे क्लॅफॅममधले एक शाळा-शिक्षक होते. आपल्या कोशात त्यांनी उद्धरणे देऊन शब्दांचा वापर कसा झाला आहे किंवा होतो, हे दाखवून दिले आहे. इंग्लिश भाषेच्या इतिहासाचे त्यांनी कालक्रमाने चार प्रमुख टप्पे सोपे केले. पहिला होता इ०स० १३०० ते १५५८पर्यंत म्हणजे पहिल्या एलिझाबेथ राणीच्या राज्यारोहणापर्यंतचा. दुसरा इ०स० १६६०पर्यंत म्हणजे राजसत्तेच्या पुन:स्थापनेपर्यंतचा. तिसरा इ०स० १७१४पर्यंत म्हणजे पहिला जॉर्ज या हॅनोव्हरियनत राजापर्यंत आणि चौथा इ०स० १८१८पर्यंत म्हणजे जेव्हा रिचर्डसन यांचा कोश 'एनसायक्लोपीडिया मेट्रोपॉलिटाना'च्या खंडांमधून क्रमशः प्रसिद्ध व्हायला लागला तेव्हापर्यंत. या प्रत्येक टप्प्यात शब्द कसा वापरला गेला हे रिचर्डसन यांनी सोदाहरण दाखवून दिले आहे. याला थोडक्यात त्या शब्दाचा इतिहास, चरित्र किंवा हिंदीतला जास्त चपखल शब्द 'जीवनी'च म्हणता येईल. भविष्यात शब्द कसा वापरावा यापेक्षा भूतकाळात तो कसा वापरला गेला आहे, हे दाखवणे त्यांना जास्त महत्त्वाचे वाटले. हा त्यांचा अतिशय अभिनव असा दृष्टिकोण होता. यालाच पुढे 'हिस्टॉरिकल प्रिन्सिपल्स' असे नामाभिधान प्राप्त झाले. 'ओइडी' या नावाने प्रसिद्ध असलेल्या कोशाची रचना या तत्त्वांवर झाली.

(२) असा ऐतिहासिक कोश ज्या तत्त्वांवर आधारलेला असावा, ती तत्त्वे डॉ० कत्रे यांनी गणितातील परिभाषा वापरून सांगितली आहेत. जिज्ञासूंनी त्यासाठी त्यांचा पुढे उल्लेखिलेला लेख पाहावा - 'न्यू इंडियन अँटिकरी', व्हॉल्यूम IV 1941-42, पृष्ठे 271-279. ■

[मराठी अभ्यास परिषदेतर्फे दि० २७ फेब्रुवारी २०१२ला आयोजित परिसंवादात सादर केलेला निबंध]

# धर्मसंस्थेची भाषा

अरुण शिंदे

( १ )

मानवी जीवनाच्या विविध क्षेत्रांमध्ये भाषेचा वैविध्यपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण प्रयोग होत असतो. मानवी मन, मेंदू व वर्तनाच्या पातळ्यांवर आविष्काराचे माध्यम भाषा असते. भाषेशिवाय मानवी जीवन शून्यवत ठरेल, अशी परिस्थिती आहे. मानवी संस्कृतीच्या प्रगतीचे रहस्य मानवी मेंदूतील भाषिक केंद्रामध्ये आहे. भाषिक व्यवस्था सारखी असली तरी विविध क्षेत्रांमध्ये वापरली जाणारी भाषिक रूपे व आविष्कार तंत्रे वेगवेगळी असतात. उदा० शैक्षणिक, प्रशासकीय, वैद्यकीय, आर्थिक आदी क्षेत्रांमधील भाषिक प्रयोग भिन्न-भिन्न असतो. त्या त्या क्षेत्रानुसार स्वतंत्र परिभाषा व शैलीरूपे विकसित होत असतात. भाषाविज्ञानामध्ये अशा उपयोजित कार्यक्षेत्र-विशिष्ट भाषेचा अभ्यास केला जातो. प्रस्तुत शोधनिबंधामध्ये धर्मसंस्थेच्या भाषेचा भाषाशास्त्रीय व समाजशास्त्रीय अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. धर्मसंस्थेच्या भाषेवर फारसे लेखन झाले नसल्याने ती संकल्पना पुरेशी स्पष्ट नाही, हेही येथे ध्यानात घेणे गरजेचे आहे.

( २ )

धर्मसंस्था ही मानवी जनसमूहाने आदिम अवस्थेत निर्माण केलेली व समाजजीवनावर सर्वाधिक प्रभाव असणारी एक प्रबळ अधिसत्ता आहे. मानववंशशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांच्या मते पृथ्वीवर पसरलेल्या प्राथमिक अवस्थेतील मानवसमूहांपासून आजच्या औद्योगिक वैज्ञानिक क्रांती पूर्ण झालेल्या विकसित समाजापर्यंत धर्मसंस्था नाही असा एकही मानवी समाज आढळत नाही. समाजात धर्म न मानणाऱ्या काही व्यक्ती, संप्रदाय तसेच चार्वाक, लोकायत दर्शनांसारखी उदाहरणे अपवादाने आढळतात. धर्म ही मानवी मनाची निर्मिती आहे. आदिम मानवी समूहाला निसर्गातील घटिते यांचे कार्यकारणभावात्मक आकलन होत नव्हते. त्यामुळे या सृष्टीचे नियमन करणाऱ्या कोणातरी एक दिव्य अलौकिक शक्तीच्या अस्तित्वाच्या काल्पनिक शक्यतेमधून 'ईश्वर' संकल्पना निर्माण झाली. या कथित निसर्गनियामक अलौकिक शक्तीशी व्यक्तिगत व सामाजिक जीवनव्यवहाराचा संबंध जोडण्याच्या प्रयत्नांमधून 'धर्म' कल्पना उदयास आली. तात्पर्य, माणसांच्या व्यक्तिगत व सामाजिक आचरणाला ईश्वरविषयक संकल्पनेची व त्याच्या

नियामकतेची जोड देऊन धर्मसंस्थेचा उदय झाला. निसर्गातीत, अत्यंत पवित्र, संपूर्ण मानवी भवितव्याशी संबद्ध, जीवन व विश्व अथवा निसर्ग यांच्या नियंत्रक अशा अलौकिक शक्तीचा स्वत:शी अनुकूल, पवित्र व घनिष्ठ संबंध स्थापित करणारी वैयक्तिक अथवा सामाजिक मन:प्रवृत्ती व त्यातून निघणारी आचरणाची पद्धती म्हणजे धर्म होय. आणि या शक्तीशी प्रतिकूल मन:प्रवृत्ती व आचरण म्हणजे अधर्म होय असे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी 'धर्म' संकल्पनेचे स्पष्टीकरण केले आहे. (जोशी, १९७९:१७)

इष्टप्राप्ती व अनिष्ट निवारणार्थ ईश्वरी शक्तीची आराधना हे धर्माचे प्रधान प्रयोजन. धर्म हा शब्द मुख्यत: आज्ञा, रूढी, कर्तव्य, अधिकार, न्याय, नीती, गुण, सदाचार, कर्म अशा अनेक अर्थाने वापरला जातो. प्राचीन समाजाचे नियमन धर्माने होत असे. व्यक्तीच्या जीवन-व्यवहारांबाबतचे नियम धर्मविषयक ग्रंथांत समाविष्ट असतात. धर्माचा वैचारिक भाग म्हणजे तत्त्वज्ञान आणि आचारविषयक भाग म्हणजे प्रार्थना, ध्यान, जप, कर्मकांड वगैरे. धर्मविषयक विचार व आचार स्पष्ट करणारी धर्माची एक स्वतंत्र भाषा असते तिला 'धार्मिक भाषा' किंवा 'धर्मसंस्थेची भाषा' असे म्हणता येते.

धर्माचे वैयक्तिक व संस्थात्मक असे दोन प्रकार पडतात. एकांतामध्ये जीवनचिंतन, ईश्वराशी तादाम्य, नैतिक वर्तन वगैरेंचा वैयक्तिक धर्मामध्ये समावेश होतो. गौतम बुद्ध, येशू ख्रिस्त, महंमद पैगंबर, प्राचीन ऋषीमुनी, नामदेव, कबीर, तुकाराम, गाडगेमहाराज वगैरे महापुरुष वैयक्तिक धर्मविचार-आचाराचे आदर्श होते. संस्थात्मक धर्मामध्ये देवदेवता व धर्माचे व्यवस्थापन, धर्मशास्त्र, कर्मकांड, धर्मशाही, पुरोहित धर्मगुरू संघटना, धार्मिक रूढीपरंपरा वगैरेंचा समावेश होतो. समाजामध्ये संस्थात्मक धर्मच प्रबळ असून त्याला 'धर्म' ही संज्ञा प्राधान्याने लागू होते. एखाद्या आदर्श धर्मपुरुषाचे वैयक्तिक धर्मचिंतनही कालांतराने धर्मसंस्थेमध्ये समाविष्ट केले जाते. अशा रीतीने, ईश्वरासह धर्मग्रंथ, धर्मशास्त्रे, धार्मिक तत्त्वज्ञान, धार्मिक आचार-विचारांची सर्व अंगोपांगे, धर्माधिकारी-पुरोहितशाही, कीर्तनकार-प्रवचनकार, धर्मप्रसारक, मंदिर-मशीद, चर्च वगैरे प्रार्थनास्थळे, धर्मक्षेत्रे, धर्मानुयायी आदी धर्मविषयक सर्व घटकांचा समावेश धर्मसंस्थेमध्ये होते.

(३)

भाषेच्या मौखिक आणि लिखित अशा दोन्ही रूपांमधून धर्मसंस्थेचा विचार आविष्कृत होत असतो. मौखिक आविष्कारशैलीचे सर्जक उपयोजन जगभरातील धर्मसंप्रदायांनी केलेले दिसून येते. त्यामुळे सामान्य निरक्षर जनसमूहांमध्ये धर्मतत्त्वांचा प्रसार होत गेला व लोकांमध्ये धर्माचा बळकट पाया तयार झाला. एका पिढीपासून पुढच्या अनेक पिढ्यांपर्यंत धर्मतत्त्वे व आचारविचार पद्धती मौखिक परंपरेने हस्तांतरित

होत राहिल्या. भाषेच्या मौखिक आविष्कारसामर्थ्याच्या जोरावर धर्मपरंपरांचा प्रवाह त्याच्या उगमापासून आजपर्यंत जिवंत व प्रवाहित राहिला आहे. प्रत्येक धर्मामध्ये मौखिक आविष्काराची काही अंगे व तंत्रे आहेत. वेदांची रचना साधारणपणे इ०स०पू० ३००० ते इ०स०पू० १५०० या काळात झाली. तेव्हापासून आजपर्यंत वेदांची मौखिक परंपरा भारतात जिवंत आहे. हजारो वर्षांपासून वेदसूक्तांचे उच्चारण जसे केले जात होते, अगदी तसेच उच्चारण करणारे वेदपाठक काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत आजही सापडतात. त्या लोकांची एकमेकांशी कधी गाठभेटही झालेली नसते. पण सर्वांचे वेदपठण अगदी एकसारखे असते. उदात्त, अनुदात्त आणि स्वरित अशा तीन प्रकारच्या स्वरांनी वेदांची भाषा निबद्ध आहे. हे स्वरसुद्धा अगदी जसेच्या तसे म्हटले जातात. त्यात किंचितही फरक पडत नाही. १०२८ सूक्ते असलेल्या ऋग्वेद संहितेत एक पाठभेद आहे. तोही फक्त एका कान्याचा. हजारो वर्षांपासून ही मौखिक परंपरा चालत आलेली आहे. वेदांची परंपरा श्रवणावर असल्याने त्यांना 'श्रुति'ही म्हणण्यात येत. (दीक्षितः २३, २४) वेदाप्रमाणेच विविध मंत्र, धार्मिक रीतिभाती, आर्दीचा बहुतांश भाग मौखिक भाषिक आविष्कारांमधून समाजमनात पसरत आला आहे, असे दाखविता येते.

मुस्लिम धर्मातील 'कलम-ए-तय्यबा' व 'कलम-ए-शहादत' यासारख्या मंत्रांचे मौखिक परंपरेने पावित्र्यपूर्वक उच्चारण व जतन केले जाते. इस्लामने आपल्या अनुयायांमध्ये धर्मभाव निर्माण करण्यासाठी मौखिकतेचा प्रभावी वापर केला आहे. कलमा किंवा कलिम म्हणजे वाक्य, शब्द किंवा वचन आणि तय्यब म्हणजे पवित्र. हा मंत्र पुढीलप्रमाणे आहे - ''लाइलह इल्ल ल्लह मुहम्मदउर रसूल ल्लह'' (एका परमेश्वराशिवाय दुसरा परमेश्वर नाही आणि मुहम्मद त्याचा प्रेषित आहे.), कलम-ए-शहादत (साक्षवचन) पुढीलप्रमाणे आहे - ''अशहद अन्नला लह इल्ल ल्लह और अराहद अन्न मुहम्मदन अब्दहू व रसूलहू'' (मी अशी साक्ष देतो की, अल्लाहखेरीज दुसरा कोणी उपास्य नाही, मुहम्मद हा त्या परमेश्वराचा सेवक व प्रेषित आहे). पवित्र मंत्रातील ही भाषा धर्मनिष्ठा व धर्मपालनाचा आदेश धर्मानुयायांना देत असते. तिच्या मौखिक रूपांमुळे ती सर्वदूर ग्रामीण सामान्य जनसमूहांपर्यंत पोहोचते व लोकांच्या धर्मभावनेचे प्रतीक बनते. सामान्य जनसमूह अशा छोट्यामोठ्या गोष्टींनाच धर्माचे रूप मानतो. अशा बाबतीत तो कट्टर असतो. लोकमानसाची ही नस धर्मसंस्थेने अचूक ओळखून धर्मप्रसारासाठी मौखिक भाषातंत्रांचा परिणामकारक वापर केला. ख्रिस्ती धर्मातील पश्चात्ताप/पापाची कबुली, जैन-बौद्ध धर्मातील वचने, शिखांचे पाठ व प्रार्थना यांसारख्या धर्मविषयक आचारसंहिता मौखिक भाषिक परंपरेने चालत आलेल्या आहेत. अशा काही उदाहरणांवरून धर्मविषयक विचार-उच्चारांमध्ये असणारे मौखिक भाषेचे महत्त्व व पावित्र्य प्रत्ययास येते. महानुभावांनी मौखिक परंपरेने जपलेल्या चक्रधरांच्या आठवणी, तसेच

वारकरी भक्तमंडळींनी मौखिकतेने जपलेले 'ज्ञानेश्वरी', 'तुकारामगाथा' यांसारखे ग्रंथ नंतरच्या काळात मौखिक साधनांवरून तयार केले आहेत. मौखिक भाषिक संस्कृती ही कमीअधिक प्रमाणात काव्याभिमुख, कष्टकरी ग्रामीण वर्गाशी संबंधित आणि वंचित गरीब लोकांच्या सुधारणावादी धर्मचळवळीशी निगडित असल्याचे वारकरी परंपरेवरून म्हणता येते.

डॉ० भालचंद्र नेमाडे यांनी वारकरी चळवळीच्या मौखिक आविष्काराचे शैलीसामर्थ्य सांगितले आहे. डॉ० नेमाडे यांच्या मते मौखिक भाषिक परंपरेमुळे परचक्र वा धर्मांध राज्यकर्ते यांच्या काळात धर्मसाहित्याचा नाश होणे टळले. मौखिकता ही संवादरूपी असल्याने वक्ता आणि श्रोता या दोघांत प्रत्यक्ष संवाद स्थापन करते. त्यायोगे बोलणाऱ्याची प्रत्यक्ष शारीरिक उपस्थिती आणि परिणामत: त्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव याही गोष्टी सूचित होतात. भाषेचा मूलभूत उपयोग म्हणजे ध्वनिप्रतीकांचे बाह्यरूप टिकवून त्यायोगे भाषिक समूहांचे अखंडत्व अधिक बळकट करणे; हे काम मौखिक भाषिक आविष्काराने घडते. ह्या गुणधर्मांचा वारकरी पंथाने प्रभावी वापर करून आविष्काराच्या अनेक मौखिक शैलींचा विकास केला. पुराण, प्रवचन, पारायण, पाठ, यांसारख्या धार्मिक प्रकारांबरोबर ओवी, अभंग, पद, भूपाळी, यांसारख्या अत्यंत लोकप्रिय ठरलेल्या वाङ्मयप्रकारांचाही ह्यात समावेश होतो. गोंधळ, रूपक, भेदिक, जागरण, लळीत, निरनिराळ्या आरत्या, भारूड यासारख्या नाट्यात्मक आणि संगीतात्मक प्रकारांचा काही प्रसंगी प्रयोग होतो. मंत्र, नामस्मरण आणि हरिपाठ हे वैयक्तिक पूजेसाठी तर कथा, पोथी, सप्ताह, काला, पालखी, दिंडी, वारी, भजन या गोष्टी मोठ्या समूहांच्या एकत्र येण्यावर अवलंबून असत. कीर्तन हा सर्वात महत्त्वाचा प्रकार होता. कीर्तन हे त्याच्या वैशिष्ट्यांमुळे धार्मिक व सामाजिक जागृतीचे मुक्त विद्यापीठ बनले. (नेमाडे, २००१; ६२, ६३) संत गाडगे महाराजांसारख्या श्रेष्ठ वारकऱ्याने या परंपरेचे संवादी व प्रबोधनात्मक भाषिक सामर्थ्य दाखवून दिले आहे. आध्यात्मिक विचार साध्या सोप्या भाषेत, व्यावहारिक उदाहरणे, दृष्टांत देऊन सामान्य ग्रामीण शेतकरी-कष्टकरी जनसमूहासमोर सर्वजनसुलभ सुबोध भाषेत पोचवण्याचे काम वारकरी संप्रदायाच्या मौखिक आविष्कार शैलीने केले. धर्मभाषेची दुर्बोधता कमी करून लोकभाषेतून अठरापगड जाति-जमातीतील लोकांपर्यंत अध्यात्म पोचविण्याचे काम वारकऱ्यांच्या मौखिक परंपरेने केले.

( ४ )

जगातील बहुतेक धर्मांनी आपापल्या धार्मिक भाषेला साक्षात देववाणीचे, प्रेषितांच्या भाषेचे निर्मितितत्त्व मानून अमानवी पातळीवर नेऊन बसविले आहे. बहुतेक प्राचीन धर्मग्रंथांमध्ये भाषा ही ईश्वरनिर्मित असल्याची वर्णने आहेत. संस्कृत (हिंदू), अरबी

(इस्लाम), लॅटीन (ख्रिश्चन), हिब्रू (ज्यू) वगैरे प्राचीन भाषा ईश्वराने निर्माण केल्याचा दावा संबंधित धर्मग्रंथांनी केला आहे. सर्व वस्तूंच्या अगोदर भाषेची उत्पत्ती झाली आणि तिने सर्व वस्तूंना नामधेये दिली, असे वर्णन ऋग्वेदात आहे. भाषेचा मूळ जो शब्द किंवा ध्वनी किंवा स्फोट तो ईश्वराने निर्माण केला, असे वर्णन वैदिक वाङ्मयात आढळते. खिस्ती मताप्रमाणे आदिमानव जो ॲडम, तो ईश्वराचा पुत्र असून ईश्वराने सर्वांगपरिपूर्ण अशी भाषा त्याच्या उपयोगासाठी त्याच्या स्वाधीन केली. सर्व पृथ्वीवर एकच भाषा व बोली होती. पृथ्वीवरील सर्व भाषांचा घोटाळा होऊ लागला म्हणून ईश्वराने निरनिराळ्या देशात त्या फेकल्या, असे म्हटले आहे. इस्लाममध्ये अरबी भाषेतील कुराण 'अल्लाह का कलाम' म्हणजे ईश्वरीय वाणी मानतात. कुराणातील प्रत्येक शब्द ईश्वरप्रणीत असल्याची त्यांची धारणा आहे. सारांश, धर्मसंस्थेने त्यांच्या भाषांना पवित्र, अपौरुषेय, प्रेषिताची वाणी, अल्लाह का कलाम वगैरे संबोधने देऊन त्या ईश्वरनिर्मित असल्याचे सिद्ध करण्याचा सर्वतोपरी प्रयत्न केला आहे. भाषाशास्त्राने तर भाषेच्या अशा उत्पत्तिविषयक सिद्धांतांना अशास्त्रीय कल्पनाविलास संबोधून या विषयावरील चर्चा व अभ्यासास पूर्णविराम दिला आहे. धर्मसंस्थेने भाषेला ईश्वरनिर्मित व पवित्र का म्हटले व त्याचा परिणाम काय झाला? या प्रश्नांचा शोध घेता असे लक्षात येते की, धर्मसत्तेने स्वत:ला ईश्वरी अधिष्ठान प्राप्त करून लोकमानसातील आपले स्थान व सत्ताकारण चिरंतन बळकट करण्यासाठी भाषेचे राजकारण केले. धार्मिक भाषा देववाणी मानली गेल्याने तिची चिकित्सा निषिद्ध ठरली. धर्माज्ञेचे पालन एवढेच धर्मानुयायांचे पवित्र कर्तव्य ठरले. धर्मभाषांची सांस्कृतिक हुकूमशाही निर्माण झाली. लोकभाषांना दुय्यम मानले गेले. या अतिरेकावरील प्रतिक्रिया म्हणून धर्मसुधारणा-चळवळीही सुरू झाल्या. 'संस्कृत वाणी देवे केली।। प्राकृत काय चोरापासौनी झाली।।' हा संत एकनाथांचा प्रश्न अशा भाषिक विद्रोहाची साक्ष देतो. धर्मसंस्थेने धार्मिक भाषेला ईश्वरी अधिष्ठान देऊन प्रामाण्यवाद रुजवला. शब्दप्रामाण्य, ग्रंथप्रामाण्य यांमुळे धार्मिक कट्टरवाद वाढला. त्याला विरोध करणारे प्रवाहही निर्माण होत गेले. एकंदरीत धर्मसंस्थेची भाषा वर्चस्ववादी प्रामाण्यवादी असते, असे म्हणता येते. त्यामध्ये धर्मसंस्थेचे हितसंबंध व सत्ताकारण दडलेले असते.

धर्मसंस्थेची भाषा अनुयायांना संमोहित करणारी असते. मानवी मनातील भावभावना, श्रद्धा, विश्वास यांना आवाहन करणारी, आश्वासित करणारी असते. माणूस हा केवळ बुद्धिवादी व तर्कप्रिय नसतो. त्याला मन, भावभावना, आशा-आकांक्षा, स्वप्ने, सुखदु:खे, असतात. दु:ख जाऊन सुख यावे, ही त्याची अपेक्षा असते. लोकांच्या दु:खनिवारणाचा, शाश्वत समाधान देण्याचा दावा धर्मसंस्थेची भाषा करते. माणसाला काय हवे असते आणि काय नको असते याचा सूक्ष्म वेध धार्मिक भाषा घेते. लोकमानसाचे तिचे आकलन अचूक असते. व्यक्तीस भावनिक आवाहन करून ती विश्वास निर्माण

करते. धर्मपरायण, ईश्वरशरण बनविते. उदा० बायबलमधील पुढील वचन पाहा : ''...यामुळे तुझे कल्याण होईल आणि या जगातील तुझे दिवस आणखी वाढतील'' तसेच 'नवा करार'मधील पुढील वचन पाहा, ''देवाने आपला प्रिय पुत्र येशू याला मानवाचे पापापासून तारण करण्याकरिता पृथ्वीवर पाठविले.'' इस्लामचा एक अर्थ 'शांती' असा आहे. गौतम बुद्धांनी तर मानवी दु:खनिवारणाचा शोध घेऊन आपल्याला गवसलेले सत्य धम्म रूपाने सांगितले. जैन, हिंदू, पारशी, ज्यू वगैरे धर्मामध्येही दु:खित, पीडित, मानवी जीवांना उद्धाराचा, मार्ग दाखविण्याचा दावा केला आहे. अशाप्रकारे मानवी दु:खावर उतारा देण्याची व शाश्वत अलौकिक सुखप्राप्तीची भाषा धर्मसंस्था करते. सामान्य जनांवर ती मोहिनी घालते.

धार्मिक भाषेमध्ये एक लयतत्त्व असते. प्रार्थना, मंत्र, वचनांचे उच्चारण वगैरेंमधून ते प्रकटते. प्रार्थना, मंत्र सामूहिक गायनाच्या व पठणाच्या वेळी लयतत्त्वाचा होणारा साक्षात्कार व आविष्कार कानामनाला भिडतो. प्रार्थनांतील भाव व उच्चारणातील लय मनाच्या तारा छेडते. प्रार्थना हा शब्द 'प्र+अर्थ' या धातूपासून बनलेला असून त्याचा अर्थ 'याचना करणे' असा आहे. ईश्वराला किंवा एखाद्या अलौकिक शक्तीला उद्देशून धार्मिक श्रद्धेने केलेले नि:शब्द वा शब्दबद्ध स्तवन म्हणजे प्रार्थना. भावोत्कट अभिव्यक्ती म्हणजे प्रार्थना. भौतिक गोष्टींच्या प्राप्तीसाठी प्रार्थनेतून देवतेला आवाहन केलेले असते. यात्वात्मक प्रार्थनेमध्ये शब्दांच्या अचूक उच्चाराशिवाय फळ मिळत नाही अशी समजूत असते. देवतेला सर्वश्रेष्ठ माणूस आत्मसंवाद करणारी भाषा प्रार्थनेमध्ये वापरलेली असते.

मंत्रात्मकता हे धर्मसंस्थेच्या भाषेचे एक वैशिष्ट्य आहे. जगातील प्रत्येक धर्मामध्ये इष्टसाधक व अनिष्टनिवारक सामर्थ्य असलले मंत्र आहेत. तथाकथित गूढ प्रभावी वा जादूटोण्यासारख्या शक्तीने युक्त असलेले ध्वनी, अक्षरे इत्यादींना वा त्यांच्या समूहांना मंत्र म्हणतात. विधियुक्त मंत्रप्रयोगाने ऐहिक व पारलौकिक ईप्सित प्राप्त होते, असे मानतात. संकटनाश, रोगनिवारण, वशीकरण, विजय, अपत्यप्राप्ती, दीर्घायुष्य, दुष्काळनिवारण आदी हेतूंनी मंत्राचा प्रयोग केला जातो. मंत्रांच्या काटेकोर भाषिक उच्चारणाला महत्त्व असते, अन्यथा कार्यहानी होते, असे मानले जाते. प्रार्थना, मंत्र, वचने वगैरेंमधील भावनिकता व संमोहित करण्याचे सामर्थ्य हे धर्मसंस्थेच्या भाषेचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. लोकमानसावर अधिराज्य गाजविण्याचे धर्मसंस्थेचे रहस्य अशा भाषेत आहे.

प्राचीन काळी धर्मशास्त्र हे सामाजिक नियमनाचे शास्त्र होते. धर्मविधींच्या संदर्भातील कार्यपद्धती धर्मशास्त्रांमध्ये निर्देशित केलेली असे. त्यामुळे धर्माज्ञेला कायद्याचे स्वरूप प्राप्त झाले होते. परिणामी आदेशात्मकता हे धर्मसंस्थेच्या भाषेचे एक विशेष लक्षण आढळते. हिंदुधर्मशास्त्र हे मुख्यत: वेद, स्मृति आणि पुराणे यावर आधारलेले आहे.

कुराण आणि प्रेषिताने केलेली कृती व त्याची वचने (हदिस) यावर मुस्लिम 'शरिअत' कायदा आधारलेला आहे. आजही तो अमलात आहे. ख्रिश्चन धर्मातील 'कॅनन लॉ', बौद्ध धर्मातील आर्यसत्ये, अष्टांगिक मार्ग, पंचशील; जैन धर्मातील रत्नत्रयी वगैरेंमधून आचरणाचे आदेश दिलेले आहेत. जीवन जगताना काय करावे आणि काय करू नये याचे प्रतिपादन धर्मशास्त्रांमधून केलेले आहे. ही भाषा आदेशाची असून धर्मशास्त्रांचे पालन अनुयायांवर बंधनकारक आहे. अन्यथा त्यांना 'पाखंडी', 'नास्तिक', 'काफर', 'धर्मद्रोही', वगैरे ठरवून शिक्षेस सामोरे जावे लागते. धर्मशास्त्रांची भाषा शब्दप्रधान, विधानात्मक, वाच्यार्थयुक्त असते. कार्यकारणभाव, तर्कशुद्धता यांचा बहुधा अभाव आढळतो. म्हणूनच धर्मशास्त्राच्या चिकित्सेस बंदी घातलेली असावी. 'शापवाणी'ची संकल्पना म्हणजे धर्माचा लोकमानसावर दहशत बसविण्याचा भाषिक प्रयोग आहे.

धर्मसंस्थेने भाषिक प्रयोगाच्या माध्यमातून स्वत:ला ईश्वरनिर्मित, सार्वभौम, निरंकुश, सर्वशक्तिमान ठरविले. धर्मसंस्थेच्या या भाषिक सांस्कृतिक दहशतीने सामान्यजन अगतिक, भयभीत, असाहाय्य व पर्यायाने देवधर्मशरण झाले. माणसाने धर्म निर्माण केला ही वस्तुस्थिती मान्य करणारा एकही शब्द कोणत्याच धर्ममध्ये आढळून येत नाही. वेद 'अपौरुषेय', पुरुषापासून न झालेले म्हणजे परमेश्वराने निर्माण केलेले. इस्लाम धर्म म्हणतो, 'हे प्रेषिताने म्हणजे देवाच्या दूताने, महंमद पैगंबराने सांगितले आहे.' बायबलमध्ये 'गॉड सेज, परमेश्वराने सांगितले' असे म्हटले आहे. बौद्ध धर्म हा याला सन्माननीय अपवाद आहे. त्याचा उद्गाता गौतमबुद्ध हा एक माणूस होता. एकंदरीत जगातील बहुतांश धर्मपंथांनी स्वत:ला ईश्वराशी जोडून घेण्यासाठी भाषेचा विलक्षण चातुर्याने उपयोग केला व त्यामध्ये ते यशस्वी झाले.

निषेधात्मकता हे धर्मसंस्थेच्या भाषेचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्य सांगता येते. विहित व निषिद्ध या दोन परस्परविरुद्ध कृतीनेच धर्म व अधर्माचे स्वरूप निश्चित केले जाते. निषेध ही देवाची आज्ञा असून ती मोडल्यास देव शिक्षा देतो. या निषिद्ध कल्पनेत धर्माचे बीज आहे असे काहीजण मानतात. ख्रिस्ती धर्मातील ॲडम आणि ईव्ह (आदिपुरुष आणि आदिमाता) यांची कथा या दृष्टीने बोलकी आहे. देवाने प्रथम ॲडमची निर्मिती केली व त्याच्या बरगडीपासून ईव्हची निर्मिती केली. त्यांना कशाचेच ज्ञान नव्हते. ते वस्त्रहीन अवस्थेत जगत होते. देवाने त्यांना ज्ञानाचे फळ खाण्यास बंदी केली. पण ईव्हने ते फळ खाल्ले. हे ख्रिस्ती समाजामध्ये 'द ओरिजिनल सिन' म्हणजे जगातील 'आद्य पाप' म्हटले जाते. ईश्वराची आज्ञा मोडून ज्ञानाचं फळ खाणं हे आद्य पाप आणि त्या पापाचं प्रायश्चित्त म्हणून ईश्वराच्या पुत्राला क्रूसावर बळी जावं लागलं असंही म्हटलंय. ही कथा धर्माच्या निषेधात्मक भाषेवर पुरेसा प्रकाश टाकते. अनेक धार्मिक कल्पनांचा व आचारांचा उगम निषेधात आढळतो. काय करू नये यावर धर्माचा भर अधिक असतो.

निषेधात्मक भाषेची निर्मिती व पालन यामागे भीती ही प्रबळ भावना कार्यरत असते. दैवी अनर्थांचे निवारण हा निषेधपालनामागचा उद्देश असतो. धर्मसंस्थेच्या निषेधात्मक भाषेमुळे स्त्रियांना पुरुषांची, कनिष्ठ वर्णीयांना उच्च वर्णीयांची, प्रजेला राजाची, तरुणांना वृद्धांची गुलामगिरी पत्करावी लागते. स्त्रीशूद्राविषयीच्या निषेधाज्ञा ह्या मानवजातीवरील कलंक ठरल्या आहेत. निषेधात्मक भाषेचे काही फायदेही आहेत. विवाहाचे पावित्र्यरक्षण, जीवितरक्षण, संपत्तिरक्षण, समाजव्यवस्थेचे नियमन अशा काही गोष्टी पाप-पुण्यासारख्या निषेधात्मक अंधश्रद्धांतूनच समाजाला लाभल्या आहेत.

यातुसंबंध निषेध व कामभावसंबंध निषिद्धता हे धर्मसंस्थेच्या भाषेचे विशेष दि०के० बेडेकर यांनी नोंदविले आहेत. (बेडेकर, १९६९ : ७६-८७) यातु म्हणजे वस्तूंच्या अंगी मानवाने कल्पलेली पवित्रता, अपवित्रता व सामर्थ्य. उदा० 'नारळ फोडणे'च्या ऐवजी 'श्रीफल वाढविणे' असा शब्दप्रयोग केला जातो. 'वाढविणे' किंवा 'वाढणे' या शब्दप्रयोगाने समृद्धीचा उच्चार होतो व उच्चाराचा मंत्रसदृश यातुप्रेरित प्रभाव पडतो ही कल्पना या निषेधाच्या मागे आहे. कामभावना ही मानवी मनातील एक नैसर्गिक भावना असूनही धर्मभाषेने तिच्याविषयी निषिद्धात्मक भूमिका घेतलेली आहे. धर्मभाषेमध्ये कामभावना व त्याच्याशी निगडित अंगे यांना अपशब्द मानले जाते. दुसरे एक महत्त्वाचे म्हणजे निवृत्तीपर धर्मविचारामध्ये कामभावनेला 'भोग' म्हणून पापाचे मूळ मानण्याची प्रवृत्ती दृढ झाली व धर्मभाषेत प्रणयभावना निषिद्ध झाली. मात्र अश्वमेध यज्ञामधील अश्वमेधाहुतीचे मंत्र कमालीचे अश्लील असूनही ते विधिपूर्वक जाहीरपणे म्हटले जात होते. याचे कारण यज्ञविधीला यातुक्रियेशी जोडले गेले आहे. या दृष्टीने पुत्रप्राप्तीसाठी किंवा शेतजमिनीचा पिकाऊपणा वाढविण्यासाठी केलेले अश्लील विधी, मांगल्यवृद्धीच्या दृष्टीने खोदलेली मिथुनशिल्पे यांच्या भाषेचे वाचन केल्यास त्यांचा वास्तविक अर्थ लागण्यास मदत होईल, असे वाटते.

रूपकात्मक भाषा हा धर्मविषयक लेखनाचा एक महत्त्वाचा विशेष आहे. प्राचीन धर्मविषयक वाङ्मयामध्ये पुराणकथा, मिथके, दैवतकथा जगभर आढळतात. पुराणकथा या रूपकात्मक आहेत. त्यांची भाषा वाचता आली तरच त्यांचा वास्तविक अर्थ कळण्यास मदत होते. उदा० कृष्ण व राधा यांच्या लीलांचा परमात्मा व भक्त या रूपात अर्थ लावला गेलेला आहे. याप्रमाणे ऋग्वेदातील पुरुषसूक्तात आलेले विराट पुरुषाचे रूपक, बायबलमधील ॲडम व ईव्ह यांची रूपककथा, बोधिसत्त्वाविषयीच्या कथा वगैरेंचा अन्वयार्थ रूपकात्मक भाषेच्या उलगड्यातून लावता येतो. उदा० बायबलच्या 'जुन्या करारा'तील ॲडमच्या बरगड्यांतून ईव्हची निर्मिती झाली, ही कथा स्त्रीला पुरुषापेक्षा कमी लेखले जात असल्याचे द्योतक आहे; असे मत मनोविश्लेषणाच्या आधारे थीओडर राईकने मांडले आहे. (साळुंखे, १९८०; ८३१) दैवतकथा वा पुराणकथांची निर्मिती यामध्ये भाषेचा

मोठा वाटा असतो. उदा० भाषेच्या व्याकरणानुसार शब्दांना असलेल्या लिंगांचा पुराणकथांतील देवादिकांच्या स्वरूपावर प्रभाव पडतो. कारण पदार्थांचे मानवीकरण व दैवतीकरण करताना व्याकरणातील लिंगांचा विचार करावा लागतो. ज्या लोकांनी सूर्याला पुरुष मानले त्यांच्या भाषेत सूर्य या अर्थाचा शब्द पुल्लिंगी होता. आणि ज्यांनी सूर्याला स्त्री मानले त्यांच्या भाषेत तो शब्द स्त्रीलिंगी होता असे दिसते. शिवाय तत्कालीन समाजातील स्त्री-पुरुष सत्तास्थानांचीही काहीएक कल्पना येते. देवादिकांची नावे आणि पुराणकथांतील इतर शब्दांच्या व्युत्पत्तीवरून पुराणकथांचे मूळ आणि स्वरूप समजायला मदत होते. तुलनात्मक भाषाशास्त्रातून तुलनात्मक पुराणकथाविद्येचा जन्म झाला आहे.

प्रतीकात्मकता हे धर्मसंस्थेच्या भाषेचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. प्रत्येक धर्माची विशिष्ट प्रतीके समाजमनात कायमची कोरली गेलेली आहेत. धार्मिक श्रद्धेतून संकेताने एका पदार्थाच्या जागी मानलेला आणि विशेष शक्तीने युक्त असा मानलेला दुसरा पदार्थ म्हणजे धार्मिक प्रतीक होय. एखादा अनुभव, कल्पना, विचार, तत्त्व, देवता यांच्या अभिव्यक्तीसाठी माणसाने प्रतीकांची भाषा निर्माण केली आहे. प्रतीकांच्या दर्शनाने आपणास विशिष्ट संदेश मिळतात. ध्वनिरूप भाषेप्रमाणेच प्रतीकाद्वारे एका व्यक्तीचा अनुभव दुसऱ्यास कळतो म्हणजे भाषिक संदेशन पूर्ण होते. त्यामुळे धार्मिक प्रतीकेही एक प्रकारची भाषा असतात. म्हणूनच प्रतीके ही भाषेच्याऐवजी किंवा भाषेला अधिक प्रभावशाली बनविण्यासाठी वापरली जातात. उदा० विविध धर्मातील प्रतीके पुढीलप्रमाणे - ओम् (हिंदू, बौद्ध, जैन), स्वस्तिक (हिंदू, बौद्ध, जैन), चाँदतारा (इस्लाम), खंड (शीख), धर्मचक्र (बौद्ध), लॅटीन क्रॉस (ख्रिस्ती) वगैरेंवरील धार्मिक प्रतीकांच्या दर्शनानेही विशिष्ट संदेश आपणांस मिळतो.

धर्मसंस्थेच्या भाषेतून आदिम जनजीवनाचे अवशेष, त्यांचे भाषिक विशेष प्रकटतात. धर्मसंस्थेच्या भाषेमध्ये ऐतिहासिक, पौराणिक संदर्भ दडलेले असतात. चिकित्सक, शास्त्रीय दृष्टीने शोध घेतल्यास अज्ञात इतिहास उजेडात येण्याची शक्यता असते. उदा० ऋग्वेदातील ऋचांमधून आर्य-अनार्य संघर्ष व अनार्यांची संस्कृती, आर्यांचे जीवन, भाषा यांची काहीएक माहिती मिळते.

धर्माच्या तत्त्वज्ञानाची तत्त्वचिंतकांनी केलेली मांडणी व तिचे ग्रांथिक रूप यांची भाषा दुर्बोध, सर्वसामान्यांच्या आकलनापलीकडील असते. भाषाशास्त्राच्या मते भाषा ही लवचीक, कालानुरूप बदलणारी असते. सुलभीकरण हे तिचे महत्त्वाचे लक्षण असते. परंतु यास अपवाद ठरावा इतकी धर्मसंस्थेची भाषा ताठर व अपरिवर्तनीय असते. उदा० भारतातील विविध धर्मांमधील तत्त्वज्ञानाच्या भाषेतील काही शब्दप्रयोग पाहा. वैदिक तत्त्वज्ञानातील आत्मा, ब्रह्म, बहुदेवतावाद आणि एकेश्वरवाद; चार्वाक दर्शनातील प्रमाण, जडवाद, स्वभाववाद, आत्म्याचे निराकरण इ०; जैनदर्शनातील अनेकान्तवाद, स्याद्‌वाद,

वस्तुमीमांसा वगैरे; बौद्ध धर्मातील आर्यतत्त्वे, व्यवहारवाद, क्षणभंगवाद, शून्यवाद, शंकराचार्यांचा अद्वैतवाद, रामानुजाचार्यांचा विशिष्टाद्वैतवाद, मध्वाचार्यांचे द्वैतमत, वल्लभाचार्यांचे शुद्धाद्वैतमत, अशांसारख्या भारतीय धार्मिक तत्त्वज्ञानातील सैद्धान्तिक भाषिक संज्ञांचा साधा अर्थबोध एक टक्का लोकांना तरी होत असेल का, याची शंका येते. अशा संज्ञांमधून मांडलेले धर्म-तत्त्वज्ञान, दुर्बोधता व तत्त्वजडता यामुळे सामान्य जनसमूहांच्यापासून फार दूर राहते.

धर्माचे उपदेशक, प्रचारक यांनी मात्र लोकभाषेत, लोकजीवनाशी संवादी राहत, व्यावहारिकतेचा वापर करीत धर्मविचार समाजाच्या सर्व स्तरांपर्यंत पोहोचवला. बौद्ध भिक्खू, जैनमुनी व श्रमणी, ख्रिस्ती मिशनरी, कीर्तनकार, प्रवचनकार, वारकरी वगैरेंनी लोकभाषेत लोकाविष्काराची माध्यमे वापरून धर्माला खऱ्या अर्थाने तळागाळापर्यंत पोहोचवले. धर्मसंस्थेतील शीर्षस्थानी असलेले धर्माधिकारी उदा० पोप, शंकराचार्य, मठाधिपती वगैरेंच्या भाषेपेक्षा तळागाळातील धर्मोपदेशकांची भाषा सर्वजनसुलभ, लोकजीवनाशी व मौखिक भाषिक परंपरेशी जोडलेली असते. उदा० कीर्तन-प्रवचनातून व्यावहारिक चपखल उदाहरणे, दृष्टांतासह निरूपण, कथाकाव्यांची रसमय पेरणी, टाळ-मृदंग-वीणावाद्यांवर नामाचा सामूहिक गजर, संगीतात्मकता, नाट्यात्मकता, जिवंत संवाद, बोली भाषा अशांसारख्या अनेक गुणवैशिष्ट्यांमुळे धर्मविचार सुबोध भाषेत सामान्य लोकांपर्यंत पोहोचतो. लोकसंवादी राहून लोकाविष्कार शैली व लोकभाषेचा अंगीकार केलेल्या धर्मसंस्थेतील घटकांनी धार्मिक भाषेला आकलनसुलभ बनविली. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या संदर्भातही असे दाखवून देता येते. सुबोध धार्मिक भाषा निर्माण केली ती जनजीवनात वावरणाऱ्या धर्मप्रसारकांनीच, असे म्हणता येते.

वर्तमान स्थितीत धर्मसंस्थेतील काही घटकांनी बदलत्या परिस्थितीचा वेध घेत बाजाराधिष्ठित अर्थप्रकरणाप्रमाणेच धर्माचेही 'मार्केटिंग' सुरू केलेले आढळते. सेलिब्रेटी बुवा, बाबा, बापू, महाराज, भगवान, माँ, अम्मा वगैरे मंडळी, त्यांचे पंचतारांकित आश्रम, टीव्हीच्या विविध वाहिन्यांपासून इंटरनेटवरील पूजाविधीपर्यंत तसेच नाना शिबिरे, मेळावे, बैठका ते गावगल्लीतील धार्मिक कार्यक्रमांपर्यंत सर्वत्र धर्माचा बाजार ओसंडून वाहत आहे. जाहिरातीची तंत्रे, बाजारवाद, विक्रीशास्त्र, भक्तरूपी ग्राहकाचे मानसशास्त्र, समाजशास्त्र आदींचे आकलन करून आधुनिक तंत्रज्ञानाची साधने हिकमतीने वापरून त्यांनी लोकांच्यावर विलक्षण मोहिनी घातली आहे. उच्च, मध्यम, निम्न अशा सर्व स्तरांतील लोकांना गरजेनुरूप 'देवाधर्माचे व पुण्य फलप्राप्तीचे पॅकेज' उपलब्ध करून दिले जात आहे. अशा घटकांची धार्मिक भाषा व तिचे परिणाम हा स्वतंत्र अभ्यासविषय आहे.

वरील विवेचनावरून काही निष्कर्ष आपल्या हाती येतात. धर्मसंस्थेच्या समाजावरील

अधिसत्तेचे प्रमुख कारण भाषा हे आहे. धर्मसंस्थेने भाषेच्या मौखिक व लिखित आविष्कारशैलींचा अत्यंत कौशल्याने उपयोग करून जगभरातील व्यक्ती व मानवसमूहांचे मानसिक, भावनिक व सामाजिक अवकाश व्यापले आहे. धार्मिक भाषेतून एकीकडे स्वधर्मीयांविषयी अपार करुणा व त्यांच्या मुक्तीचा स्वर उच्चरवाने व्यक्त होत असतो. तर दुसरीकडे परधर्मीय व परमत यांविषयी असहिष्णुताही टोकदारपणे प्रकटत असते. धर्मसंस्थेच्या भाषेचे भाषाशास्त्रीय वस्तुनिष्ठ आकलनच आपल्याला धर्म, समाज व भाषाविषयक जाणिवांचा वैज्ञानिक दृष्टिकोन व नवे मानवतावादी संवेदन देईल, असे वाटते.

(विलिंग्डन महाविद्यालय, सांगली येथे दि० १६ व १७ डिसेंबर २०११ रोजी झालेल्या भाषाविज्ञान परिषदेमध्ये वाचलेला शोधनिबंध)

**संदर्भ :**

**मराठी ग्रंथ**


( १ ) काणे म०म०, 'धर्मशास्त्राचा इतिहास', (अनु०) य०आ० भट, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई, १९७०.

( २ ) कालेलकर ना०गो०, 'भाषा आणि संस्कृती', मौज प्रकाशन, मुंबई, १९६२.

( ३ ) काळे कल्याण, सोमण अंजली, 'आधुनिक भाषाविज्ञान' (संरचनावादी, सामान्य आणि सामाजिक), प्रतिमा प्रकाशन, पुणे, २००३.

( ४ ) कुलकर्णी कृ०पां०, 'मराठी भाषा : उद्गम व विकास', मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, २००९.

( ५ ) गजेंद्रगडकर श्री०ना०, 'भाषा आणि भाषाशास्त्र', व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७९.

( ६ ) चौसाळकर अशोक, 'धर्म, समाज आणि राजकारण', लोकवाङ्मय गृह, मुंबई, २००४.

( ७ ) जोशी महादेवशास्त्री, 'भारतीय संस्कृति कोश', (धर्मविषयक नोंदी), भारतीय संस्कृति कोश मंडळ, मुंबई, १९७९.

( ८ ) जोशी लक्ष्मणशास्त्री व इतर (सं०): 'मराठी विश्वकोश', खंड १ ते १७, (धर्म, ईश्वर व भाषा विषयक नोंदी), म०रा० साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

( ९ ) डहाके व इतर, 'वाङ्मयीन संज्ञा : संकल्पना कोश', जी०आर० भटकळ फाउंडेशन, मुंबई, २००१.

(१०) दीक्षित श्रीनिवास, 'भारतीय तत्त्वज्ञान', सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे.

(११) नेमाडे भालचंद्र, 'टीकास्वयंवर', साकेत प्रकाशन, औरंगाबाद, २००१.

(१२) बेडेकर दि०के०, 'भाषेतील निषिद्धता'; पानसे मु०ग० (सं०) 'भाषा : अंत:सूत्र आणि व्यवहार', महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९६९.

(१३) मुरंजन सुमंत, 'पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास', प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई, १९९०.

(१४) वर्णेकर श्रीधर भास्कर, 'भारतीय धर्म व तत्त्वज्ञान', लेखन वाचन भांडार, पुणे, १९७५.

(१५) वरखेडे र०ना०, 'समाजभाषाविज्ञान', शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २००१.

इंग्लिश ग्रंथ :

( 1 ) Crystal David, Linguistics, Penguin Books, 1971.

( 2 ) Hocket, Charles F., A Course in Modern Linguistics, MacMillan Company, New York, 1958.

( 3 ) Hudson R. A., Sociolinguistics, Cambridge University Press, Cambridge, 1980.

( 4 ) Lyons John, Language and Linguistics, Cambridge University Press, Cambridge, 1981.

( 5 ) Trudgill Peter, Sociolinguistics : An Introduction to Language and Society, Penguin Books, 1974.

**Articles :**

( 1 ) Campbell Anthony : Religion and Language (www.acampbell.org)

( 2 ) Chikermane Gautam : Does religion need a language?, Hindustan Times, (27-03-2011)

( 3 ) Crystal David : Language and Religion (www.davidcrystal.com)

( 4 ) Dragoljub B. Dordevic : The Sociological Understanding of the Language of Religion (www.politicsandreligion.com)

( 5 ) Horold F. Schiffman : Religion and Language (www.ccat.sas.upenm.edu.)

■



अनुक्रमणिका

# चिनी भाषा

नीलकंठ बापट

एकोणिसावे शतक हे युरोपचे होते. विसावे शतक हे अमेरिकेचे होते. एकविसावे शतक मात्र पश्चिमेकडील देशांऐवजी पूर्वेकडील देशांच्या प्रभावाखाली असेल, हे नि:संशय. विशेषत: चीनचा प्रभाव लक्षात राहण्यासारखा असेल. चीन हा आपला शत्रू आहे की मित्र, ह्याविषयी मतभेद होतील; पण एक गोष्ट नक्की की तो सदासर्वकाळ बलदंड स्पर्धक राहील आणि हे निश्चितच स्वागतार्ह आहे.

चिनी माणसाला समजून घ्यायचे असेल तर त्यांची भाषा-बोली व लेखी-समजून घेतली पाहिजे. चिनी लोकांनी इंग्रजीसारख्या आंतरराष्ट्रीय भाषेचा आधार न घेता आपल्याच भाषेचा आधार घेऊन प्रगती साधली आहे. आपल्याला मात्र आपल्या इंग्रजी भाषेवरील प्रभुत्वाविषयी विनाकारण अभिमान आहे. त्या भाषेशिवाय आपल्याला प्रगती करता येणार नाही, हा आपला गैरसमजच आहे. प्रगती ही आपल्याला आपल्याविषयी काय वाटते, ह्यावर अवलंबून असते.

चिनी भाषेची काही वैशिष्ट्ये सांगता येतील. ही वैशिष्ट्ये काही प्रमाणात चिनी समाजाची, तेथील लोकांची वैशिष्ट्ये दर्शवतात. चीन हे एक अत्यंत महत्त्वाकांक्षी राष्ट्र आहे. नेपोलियनचे दोनशे वर्षांपूर्वीचे उद्‌गार आहेत, ''सिंह झोपला आहे तेच बरे. त्याला उठवू नका.'' अनेक व्यापारी व राजकीय पुढाऱ्यांच्या निवेदनात उल्लेख येतो की चिनी लोक संदिग्ध बोलतात. त्यामुळे ते नक्की काय म्हणाले हे सांगता येत नाही. त्यांच्या बोलण्यात 'हिडन अजेंडा' असतो. परिस्थितीनुसार ते शब्दांचे अर्थ बदलतात. त्यामुळे दुसऱ्यांच्या मनात अधिक गोंधळ निर्माण होतो. आपल्या संस्कृतीच्या प्राचीनत्वाविषयी त्यांना प्रचंड अभिमान आहे. त्यांच्या संपर्कात न आलेल्या समाजाला त्यांच्याशी संवाद साधणे कठीण होते.

भारतीय भाषा व चिनी भाषा ह्यांच्यांत मूलभूत फरक आहेत. त्यामुळे त्यांच्यात संवाद घडून येण्यात अनेक अडचणी निर्माण होतात. भारतातील बहुसंख्य लिखित भाषा ह्या अक्षरांवर आधारित आहेत. चिनी लेखन मात्र वेगळ्या स्वरूपात आहे. चिनी लिपी अक्षरांवर आधारित नाही. ती चित्रांवर आधारित आहे. हे चित्र ध्वनी निर्देशित करत नाही तर अर्थ निर्देशित करते. उदा० मराठी माणसाला घोड्याचा निर्देश करायचा असेल तर तो 'घोडा' असे लिहील. घ्+ओ+ड्+आ असे त्याचे भाग दर्शवता येतात. त्याद्वारे

ध्वनी घ, ड यांचा निर्देश होतो. आपण लेखन वाचताना मनात शब्दाचा उच्चारही करतो, मग त्याचा अर्थ लक्षात घेतो. डोळ्याने 'घो,डा' ही चिन्हे पाहतो. मनात त्याचा उच्चार करतो आणि त्याचा अर्थ लावतो. चिनी लेखन वाचताना होणारी प्रक्रिया वेगळी आहे. तो घोड्याचे चित्र काढेल. हे चित्र पाहून दुसऱ्या चिनी माणसाला तो घोडा आहे हे समजेल, मराठी माणसालाही त्याचा अर्थ समजेल आणि इंग्रजी माणसालाही अर्थ समजेल. त्या चित्राला घोडा म्हणतात का 'हॉर्स' म्हणतात, ह्याचा संबंध नाही. चित्राचा अर्थ लगेच समजतो. त्याची 'घोडा' वा 'हॉर्स' ही ध्वनिरूप प्रतिमा करणे आणि मग त्याचा अर्थ समजणे अशी चिनी भाषेत साखळी निर्माण करण्याची जरुरी नाही. चिनी भाषेच्या ह्या वैशिष्ट्यामुळे चीन हा एकभाषी आहे, असा समज होतो; पण ते अर्धसत्य आहे. चीनमध्येही भारतासारख्याच अनेक भाषा आहेत. पेकिंगचा माणूस, कॅंटनचा माणूस व शांघायचा माणूस एकत्र आले तर ते काय बोलतात हे एकमेकांना काही समजणार नाही, कारण प्रत्येकाची बोली भाषा वेगळी आहे. पण त्यांनी त्यांचं म्हणणं लिखित स्वरूपात मांडलं तर ते एकमेकांना समजेल. भारतात वेगळी परिस्थिती आहे. उदा० तमिळ व मराठी माणूस भेटले व त्यातल्या एकाने 'नारायण' शब्द उच्चारला तर तो एकमेकांना समजेल; पण तो शब्द लिहिला तर तो समजणार नाही. कारण लिपी वेगळी आहे. चिनी भाषकाची विचारप्रक्रिया मराठी भाषकाच्या विचारप्रक्रियेपेक्षा वेगळीच असते.

चिनी भाषा चित्रमय आहे हे खरे, पण ते पूर्ण सत्य नाही. जोपर्यंत निर्देश करायच्या वस्तू मर्यादित आहेत तोपर्यंत चित्राद्वारे संवाद साधता येईल. पण जेव्हा अशा वस्तूंची संख्या वाढते, तेव्हा प्रत्येक वस्तू चित्ररूपात दाखवणे कठीण होते. चीनमध्येही काही काळ चित्रलिपी चालली; पण जेव्हा अशा चित्रांची संख्या प्रचंड वाढली, तेव्हा परिस्थिती स्फोटक झाली. तसेच मूळ चित्रांची रूपेही काळानुसार बदलत गेली. त्यामुळे चिनी भाषेतील साक्षरता प्राप्त करण्यासाठी किमान पाच हजार चित्रांची ओळख असणे जरुरीचे असते. चिनी साक्षरता कष्टदायक आहे. ज्या गोष्टींना रूप नाही - जसे आनंद, दु:ख इ० ह्यांनाही चित्ररूप देणे कठीण होऊ लागले. चित्रसंख्या कमी करण्याच्या उद्देशाने एकाच चित्राला अनेक अर्थ प्राप्त होऊ लागले. त्यातील फरक 'टोन'/स्वराघाताद्वारे होऊ लागले. सकृत्‌दर्शनी दोन शब्द एकच दिसतात; पण त्यांतील उच्चारांत अल्पसा फरक असतो. हा फरक बिगरचिनी माणसाला समजत नाही, पण चिनी माणसाला समजतो. समजा, चिनी भाषेत शत्रू व मित्र दर्शवणारा एकच शब्द आहे (मित्र). फरक उच्चारातील आहे. समजा, दोन चिनी माणसे व एक मराठी माणूस एकत्र आले. एक चिनी माणूस दुसऱ्या चिनी माणसाला मराठी माणसाची ओळख करून देत आहे. मराठी माणसालाही चिनी भाषा समजते. पण 'टोन'मधील फरक जाणवत नाही, तर काय होईल? एका चिनी माणसाने दुसऱ्या चिनी माणसाला मराठी माणसाची ओळख करून

देण्यासाठी 'मित्र' शब्द वापरला. तो असा उच्चारला की त्याचा अर्थ शत्रू असा होईल. मराठी माणसाला ते कळणारच नाही. त्याला वाटेल आपल्याला त्याने मित्र म्हटले आहे; पण प्रत्यक्षात त्याला शत्रू म्हटलेले असेल... काही चिनी शब्द दहा-बारा 'टोन्स'मध्ये उच्चारता येतात आणि तेवढेच भिन्न अर्थ त्या शब्दाला प्राप्त होतात. माझ्या असेही वाचनात आले की फक्त दहा-बारा शब्दांच्या साहाय्याने काहींनी कादंबरीही लिहिली आहे. हे फक्त 'टोन' ह्या संकल्पनेमुळे शक्य होते. चिनी माणसाच्या बोलण्यात स्पष्टता नसते. ''मी तसे म्हटलेच नाही'' असे तो सहजपणे म्हणतो. त्याला साहाय्यभूत ठरते ती 'टोन' ही संकल्पना.

चिनी भाषेतील उच्चारही स्पष्ट नसतात. उदा० 'प' आणि 'ब' वर्णोच्चारांतील फरक स्पष्ट नाही. त्यामुळे 'बापट' हा शब्द चिनी माणसाने उच्चारल्यास तो 'बापट' म्हणाला का 'पापट' म्हणाला हे समजणे कठीणच! त्यामुळेच आजपर्यंत प्रचलित असलेले 'पेकिंग'चे नाव 'बेजिंग' झाले. उच्चारातील संदिग्धता हाही गैरसमज वाढवणारा महत्त्वाचा घटक आहे.

चिनी भाषेत गावांची वा व्यक्तींची नावे लिहिणे कठीण असते. विशेषत: जी नावे अर्थपूर्ण नाहीत त्यांचे चिनी लिपीत लिप्यंतर करणे गोंधळ निर्माण करणारे आहे. अर्थात ह्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे चिनी लिपी चित्रमय आहे. त्यातील अक्षरे अर्थ स्पष्ट करतात; ध्वनी नाही. माझे नाव 'नीलकंठ' आहे. ह्या नामाचे चिनी लिप्यंतर करायचे असेल तर दोन पर्याय आहेत. एक : ह्याचा अर्थ लक्षात घेऊन लिप्यंतर करणे किंवा दोन : त्याच्या ध्वनीचे लिप्यंतर करणे. पहिल्या पर्यायानुसार 'नीलकंठ'चे दोन भाग केले जातील. 'नील' व 'कंठ'. चिनी भाषेतील निळा रंग असलेला शब्द शोधला जाईल व 'कंठ' शब्दाचा चिनी पर्याय शोधला जाईल. ते एकत्र केले जातील. ह्या पर्यायाने निर्माण केलेला शब्द चिनी माणसाने उच्चारला तर मला तो कळणार नाही. कारण त्यातून निर्माण होणारा ध्वनी 'नीलकंठ'सदृश नसेल. इंग्रज माणसाने हा चिनी पर्याय वापरला तर तो मला 'ब्ल्यू थ्रोट' Blue Throat म्हणून हाक मारेल. दुसरा पर्याय वापरला तर इंग्रज माझे नाव - Nilkanth असे करेल व त्याचा केलेला उच्चार मलाही समजेल. हा दुसरा पर्याय चिनी माणसाला उपलब्ध नाही. त्याला 'नील' उच्चार असलेला चिनी शब्द शोधावा लागेल व 'कंठ' उच्चार असलेला दुसरा शब्द शोधावा लागेल आणि ते एकत्र करून मला हाक मारावी लागेल. हे काम फारच कठीण आहे. कारण अशा रीतीने तयार केलेल्या शब्दाला वेगळाच अर्थ असेल!

चिनी भाषेत असंख्य अक्षरे आहेत. जेवढे शब्द तेवढी अक्षरे. अशा रीतीने भाषेवर प्रभुत्व मिळवण्यासाठी कित्येक हजार चित्रे चिनी माणसाला लक्षात ठेवावी लागतात. ह्यावरून श्रम करण्याची चिनी माणसाची क्षमता लक्षात येते. चिनी माणसाची जिद्द



अनुक्रमणिका

लक्षात घेण्यासारखी आहे. इतक्या अवघड भाषेवर प्रभुत्व मिळवूनच त्या देशाने ९५% साक्षरता मिळवली आहे. स्वातंत्र्यापूर्वीची आपली स्थिती आणि चीनची स्थिती वेगळी नव्हती. आज आपली साक्षरता मात्र ६०% आहे.

चिनी भाषेत अंकलेखनाचीही पद्धतही फारशी कार्यक्षम नाही. तरीही शास्त्रीय आकडेमोड करण्यासाठी आवश्यक सुविधा त्यांच्याजवळ आहेत व ते शास्त्रीय प्रगती करू शकले आहेत. त्यांच्याजवळ आधुनिक तंत्रज्ञान आहे.

चिनी भाषेतील बहुसंख्य शब्द एक-स्वरीय आहेत. तेव्हा आपले अनेक विचार व्यक्त करण्यासाठी चिनी माणसाजवळ शब्दसंग्रह मर्यादित राहतो आणि एकाच शब्दाचे विविध उच्चार करून असंख्य शब्द त्यांनी निर्माण केले आहेत. भारतीयांना ह्याची सवय नाही. लिहिलेल्या प्रत्येक अक्षराचा उच्चार करायचा आणि उच्चारलेल्या प्रत्येक ध्वनीसाठी स्वतंत्र अक्षर लिहावयाचे ही भारतीय परंपरा. आपल्याला साक्षर होणे त्यामानाने कितीतरी सोपे आहे. चिनी लिपीतील अनेक अक्षरे लिहिण्यासाठी अवघड आहेत. त्यात उभ्या, आडव्या, तिरक्या अशा चौदा-पंधरा रेषांचे एक अक्षर होते. काही शब्दांसाठी ३५-३६ रेषा काढाव्या लागतात. ह्यामुळे अक्षर ओळख हे अत्यंत कठीण काम आहे. चिनी भाषेचा शब्दकोशही तयार करणे व वापरणे तितकेच कठीण. अक्षरांनुसार शब्दांची क्रमवारी लावणे व त्यांचा संदर्भ पाहणे अवघड आहे.

आधुनिक काळात लेखन संगणकाच्या साहाय्याने केले जाते. काही हजारांच्या संख्येत असलेल्या अक्षरसंख्येमुळे की-बोर्ड तयार करणेही अत्यंत अवघड आहे. बारा प्रकारच्या विविध रेषा, ३०० मुळाक्षरे आणि पाच टोन्स ह्या सर्वांचा समावेश असणारी लिपी किती अवघड असेल ह्याचा विचार केल्यावर कळते की संगणकावर चिनी भाषेतील अक्षरे लिहिणे जवळजवळ अशक्य आहे. पण तरीही विविध खटाटोप करून आज चिनी लिपीसाठी सुयोग्य की-बोर्ड करण्यात यश आले आहे.

ह्या वैशिष्ट्यांचा विचार करता असे सुचवावेसे वाटते की आपण इंग्रजीला दिलेले अवास्तव महत्त्व कमी करावे व शाळा, कॉलेजातून चिनी भाषा शिकवावी. तरच ह्या एकेकाळी निद्रिस्त असलेल्या पण आज जाग्या झालेल्या सिंहाशी यशस्वीरीत्या मुकाबला करता येईल.

■

# भाषेची शब्दनिष्ठ सर्जनशीलता

नंदकुमार मोरे

समाजातील प्रत्येक व्यक्ती भाषा वापरते आणि भाषा वापरणारी प्रत्येक व्यक्ती कमी-अधिक प्रमाणात सर्जनशील असते. 'शब्द' हा भाषेतील लघुत्तम असा सार्थ घटक असतो. सुट्या सुट्या अक्षरांना भाषेमध्ये काहीही स्थान असत नाही. परंतु अक्षरांच्या म्हणजेच मूलध्वनींच्या जुळणीतून भाषेत वापरण्यायोग्य आणि व्यवहारक्षम अशा शब्दांची निर्मिती होत असते. कोणत्याही भाषेतील मूलध्वनींची संख्या मर्यादित असते. या मूलध्वनींचा वापर करून हजारो-लाखो शब्दांची निर्मिती करता येते. अशी ही निर्मिती ही भाषांतर्गत घडणारी मोठी सर्जनशीलताच आहे.

भाषेची स्वत:ची अशी एक व्यवस्था असते. त्या व्यवस्थेलाच आपण व्याकरण असे म्हणतो. या व्यवस्थेच्या चौकटीत राहून भाषेमध्ये नवसर्जन साधले जाते. ही नवसर्जनाची क्षमता भाषेच्या अंतर्गत व्यवस्थेमध्येच दडलेली असते. भाषा आतल्याआत सर्जन करीत असते. भाषेच्या अशा पद्धतीने चालणाऱ्या सर्जनाचा आणि तिच्या व्याकरणिक व्यवस्थेचाही एकाच वेळी बोध होतो. उदाहरणार्थ,

(१) प्रतिष्ठा (स्त्रीलिंगी नाम) : मूळ शब्द
(२) अप्रतिष्ठा (विरुद्धार्थी शब्द)
(३) प्रतिष्ठित (विशेषण)
(४) अप्रतिष्ठित (विरुद्धार्थी विशेषण)
(५) अप्रतिष्ठितपणाने (क्रियाविशेषण)
(६) प्रतिष्ठेखोर (स्वभावदर्शक विशेषण)
(७) प्रतिष्ठापना (स्त्रीलिंगी नाम)

शब्दपातळीवर आढळणारी वैविध्यपूर्ण सर्जकता अभ्यासण्यासाठी आपण समानार्थी, विरुद्धार्थी आणि पर्यायी अशा शब्दांचा विचार करू.

एखाद्या शब्दाचा आशय जवळपास तेवढ्याच प्रमाणात व्यक्त करणारा दुसरा शब्द म्हणजे समानार्थी शब्द होय. कोणत्याही शब्दाला समानार्थी शब्द नसतो असा एक विचार आधुनिक भाषाभ्यासात सांगितलेला आहे. कारण प्रत्येक शब्दाचे विशिष्ट असे कार्य असते. ते कार्य त्या शब्दाधारेच यथायोग्यपणे होऊ शकते. 'थंड, शीत, गार' या शब्दांमधून थंडपणा सूचित होतो. थंडपणासाठीच पुन्हा 'थंड, सुस्त, धीमा, मंद' असे





अनुक्रमणिका

काही शब्द व्यवहारात वापरले जातात. हे सर्व शब्द 'थंड' या शब्दार्थाच्या जवळचे अर्थ व्यक्त करतात. यातील पहिला गट वस्तू, पदार्थाचा थंडपणा सूचित करतो. तर दुसऱ्या गटातील शब्दांमधून सजीव प्राण्यांचा थंडपणा सूचित होतो. थंड शब्दाचे दोन अर्थ येथे सूचित होतात. व्यक्ती व्यवहारात शब्द वापरताना यातील यथार्थ शब्दाची निवड करते. उदाहरणार्थ, 'माझा मुलगा अभ्यासात जरा मंद आहे' हे वाक्य होऊ शकते. येथे 'मंद' शब्दाऐवजी 'सुस्त' शब्द वापरता येणार नाही. तसेच 'कासव धीम्या गतीने चालते' या वाक्यात 'थंड' शब्द वापरता येणार नाही.

कवितांमधून येणाऱ्या समानार्थी शब्दांचा वापर अभ्यासनीय असतो. 'आकाश' या शब्दाचे आभाळ, गगन, अंबर, नभ, अंतरीक्ष, व्योम, तारांगण, अस्मान असे समानार्थी शब्द प्रचलित आहेत. कवीला अपेक्षित असलेले सौंदर्य, नाद, गेयता साधण्यासाठी यातील योग्य शब्दांचा तो वापर करतो. उदाहरणार्थ, 'या नभाने या भुईला दान द्यावे' या काव्यपंक्तीमध्ये 'नभाने' या शब्दाऐवजी इतर समानार्थी शब्दांचा वापर केला तर ही काव्यपंक्ती अर्थहीन होणार नाही. परंतु या ओळीमधील माधुर्य, सौंदर्य लोप पावेल.

एखाद्या शब्दाच्या अर्थाचा नेमका उलट आशय व्यक्त करणारा दुसरा शब्द म्हणजे विरुद्धार्थी शब्द होय. समाजात रूढ असलेल्या एखाद्या शब्दाच्या किंवा संकल्पनेच्या अर्थाची विरुद्ध जाणीव, हे शब्द व्यक्त करतात. विरोधात्मकता ही मानवी प्रवृत्ती आहे. विरोध व्यक्त करणे, एखाद्या गोष्टीची सकारात्मकतेबरोबरच विरुद्ध बाजू जाणून घेणे, ही नकळत घडत जाणारी प्रक्रिया आहे. यासाठी भाषाव्यवहारात स्वतंत्र शब्दांची निर्मिती झालेली दिसते. प्रत्येक भाषेच्या शब्दकोशात विरुद्धार्थी शब्दांची योजना दिसते. त्यामुळे विरुद्धार्थी भाव व्यक्त करणाऱ्या असंख्य शब्दांची व्यवहारात रेलचेल दिसते. एखाद्या शब्दाची विरुद्ध बाजू ध्वनित करणाऱ्या शब्दांची संख्या अधिक असणे, हे ती भाषा समृद्ध असल्याचे लक्षण आहे. असे शब्द ही कोणत्याही भाषेची संपत्ती असते. या शब्दसंपत्तीचा कौशल्याने वापर करणे आणि मनातील विरुद्धार्थी भाव व्यक्त करणे, ही सर्जकताच होय.

समाजाचा भाषाव्यवहार तटस्थपणे न्याहाळल्यानंतर बऱ्याचदा एकाच वाक्यात परस्परविरुद्ध शब्द वापरले जात असल्याचे दिसते. उदाहरणार्थ, 'तो म्हणतोय ते चूक की बरोबर हे कळतच नाही', 'ही गोष्ट बोलून त्याने चांगलाच वाईटपणा घेतला', 'समाजात रूढ असलेली श्रेष्ठ-कनिष्ठत्वाची भावना घातक आहे', 'प्रत्येकाच्या जीवनात चढउतार येतातच', 'गप्प राहा, नाहीतर मस्करीची कुस्करी होईल', 'हे सारं त्याच्याकडून कळतनकळत घडत गेले', 'दराचं काय ते कमीजास्त बघा आणि निर्णय द्या', 'या ठिकाणाहून आपण बरेच बरेवाईट अनुभव पाठीशी घेऊन निघालोय' इत्यादी. अशी पुष्कळ

वाक्ये दैनंदिन व्यवहारात नित्य कानावर पडतात. या वाक्यांमध्ये परस्परविरोधी शब्द एकत्र वापरलेले आहेत. चांगला-वाईट, श्रेष्ठ-कनिष्ठ, चढ-उतार, मस्करी-कुस्करी, कमी-जास्त, बरे-वाईट, कळत-नकळत असे परस्परविरोधी शब्द वाक्यात एकमेकांशेजारी येऊनही विशिष्ट अशी अर्थनिर्मिती साधली जाते. हे शब्द परस्परांच्या विरुद्ध शब्द आहेत हे बोलणाऱ्याच्या फारसे लक्षात येत नाही. त्यामुळे असा भाषावापर नकळत घडून जातो.

सर्व विरुद्धार्थी शब्दाचे स्वरूप एकसारखे असत नाही. उदाहरणादाखल काही शब्द पाहा : (१) डामडौल-साधेपणा, दणकट-कमजोर हे शब्द स्वतंत्र रूप लाभलेले आहेत. (२) शुद्ध-अशुद्ध, प्रामाणिक-अप्रामाणिक या शब्दांमध्ये विरुद्धार्थीसाठी 'अ' हा पूर्वयोगी प्रत्यय लागलेला आहे. त्यातूनच त्या मूळ शब्दाचा विरुद्धार्थ उत्पन्न होतो. तसे पहिल्या शब्दांमध्ये होत नाही, तर (३) मुलगा-मुलगी, घोडा-घोडी, गाय-बैल हे शब्द लिंगविरोधावर आधारित आहेत. त्याशिवाय अनेक शब्दांचे एकापेक्षा अनेक विरुद्धार्थ संभवतात. उदाहरणार्थ, नम्र : ताठ, अविनयी, उद्धट, उर्मट, उद्दाम, मुजोर, मग्रूर, चढेल, गर्विष्ठ, उन्मत्त इत्यादी. 'नम्र' या शब्दाचा विरुद्धार्थी शब्द वापरत असताना, व्यवहारात यांपैकी कोणताही एक पर्याय वापरून चालत नाही. एखाद्याजवळ नम्रता नाही हे सूचित करताना, 'नम्र'चा विरुद्धार्थी शब्द वापरताना वरीलपैकी कोणता शब्द वापरावा हे त्या व्यक्तीच्या अंगी असलेल्या अवगुणांवर अवलंबून आहे. कारण ताठ, उद्धट, उर्मट, उद्दाम, मुजोर, मग्रूर, गर्विष्ठ या सर्व शब्दांना स्वत:चा स्वतंत्र अर्थ आहे. त्यामुळे या शब्दांचा वापर संदर्भसूचकतेने करावा लागतो. ही संदर्भसूचकता, प्रत्येक शब्दाची स्वतंत्र अर्थच्छटा, यांची जाणीव भाषा वापरणाऱ्याजवळ असायला हवी. कारण नम्रपणा कशामध्ये दिसत नाही; बोलण्यात, वर्तनात, की स्वभावात हे प्रथम पाहावे लागेल. कारण 'ताठ' हा स्वभाव असतो, वर्तन 'उद्धट' असते, बोलणे 'उर्मट' असते, पैशाची 'घमेंड', 'गर्व' किंवा 'मग्रुरी' आलेली असते.

एखाद्या शब्दाचा पर्यायी शब्द हा समानार्थी शब्द होत नाही. एखाद्या शब्दाच्या विविधांगी अर्थच्छटांसाठी समर्पक शब्द पर्यायी शब्दांमधून मिळवता येतो. 'मी आपला आभारी आहे' हे वाक्य सर्वच लोक वापरतात. 'आभारी' या शब्दाचा वापर वारंवार होऊन अर्थाला गुळगुळीतपणा आलेला असतो. त्या ऐवजी 'मी आपला ऋणी आहे' असे म्हटले तर पहिल्या वाक्यापेक्षा थोडा अधिक परिणाम साधला जातो. किंवा 'आपल्याविषयी कृतज्ञतेची भावना माझ्या मनामध्ये कायम ठेवीन' असे वाक्य वापरल्यास वेगळा परिणाम साधला जातो.

या शब्दासंदर्भात एक उदाहरण पाहता येईल. 'प्रगती' हा शब्द घ्या. व्यवसायात कुणाची 'भरभराट' चालू असते. एखाद्या उद्योगाची 'घोडदौड' पाहण्यासारखी असते. तर कुणाची 'वाटचाल' कौतुकास्पद असते. कोणी अचानक 'मुसंडी मारतो', तर कोण

जीवनात परत कधीच 'मागे वळून पाहत नाही'. या ठिकाणी प्रगती या शब्दाचे विविध पर्यायी शब्द कसे विविधांगी अर्थाविष्कार करतात हे दिसून येते. हे सर्व पर्याय त्या त्या वाक्यांसाठी समर्पक पर्याय आहेत हे यावरून दिसून येते. कोणत्याही भाषेत एका शब्दाचे असे एकापेक्षा अधिक पर्याय उपलब्ध असतात. उदाहरणार्थ, (१) तंतोतंत : हुबेहूब, अभिरूप, आहे तसा, सही सही, बरोबर, नेमका, थेट, बेमालूम, अचूक, काटेकोर, बिनचूक, एकसारखा, मापाचा, जुळणारा, तुलनीय, तुल्य, चित्रदर्शी. (२) तंत्र : रीत, पद्धत, कार्यपद्धती, प्रणाली, निधी, कौशल्य, कला, कुसर, कारागिरी, हातोटी, युक्ती, डावपेच, शास्त्र, तंत्रशास्त्र, तंत्रविद्या, तंत्रज्ञान, जारणमारण इत्यादी. या शब्दांमधून पर्यायाची निवड महत्त्वाची ठरते.

शब्दांच्या घडणीचा, निवडीचा आणि त्यातून व्यक्त केलेल्या अनुभूतीचा अभ्यास मराठीतील प्राचीन साहित्यापासून करता येतो. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास या संतांच्या रचनांमध्ये वैविध्यपूर्ण शब्दांचे भांडार आहे. तत्सम, तद्भव अशा शब्दांबरोबरच मुसलमानी राजवटीतून व्यवहारात आलेले शब्दही मोठ्या प्रमाणात वापरलेले आहेत. या संतांनी यथार्थ अभिव्यक्तीसाठी आवश्यक ठिकाणी शब्द घडविलेले आहेत. ही सर्जनशीलता स्वतंत्रपणे अभ्यासण्याइतकी वैविध्यपूर्ण आहे. असा अभ्यास मु॰श्री॰ कानडे यांनी 'मराठी शब्दसमीक्षा' या आपल्या ग्रंथात केलेला आहे. उदाहरणादाखल त्यांनी संत एकनाथांच्या भाषेच्या संदर्भात नोंदविलेले निरीक्षण पाहता येईल. ते लिहितात, 'नाथांच्या जवळ ज्ञानदेवाची प्रतिभा नसली तरी रसिकता भरपूर आहे. भाषेचे बहिरंग सजविण्याकडे त्यांनी थोड्याफार प्रमाणात लक्ष देऊन आपले लेखन आकर्षक करण्याचा प्रयत्न केला आहे. एकाच शब्दाऐवजी त्याच अर्थाने दोन शब्द जोडीने वापरले तर शैलीची रंजकता तर वाढतेच; परंतु आशयांची परिणामकारकताही अनेक पटींनी वाढते, हे भाषेचे रहस्य नाथांनी चांगल्या प्रकारे ओळखलेले आहे.'[१] या संदर्भातील एक उदाहरण येथे पाहता येईल. कानडे लिहितात, 'नाथ नवनवीन शब्द कसे घडवितात त्याचे एक विशेष उदाहरण युद्धकांडात दिसून येते. राम-रावण युद्धाचे, निरनिराळ्या निमित्ताने चित्र रंगवताना नाथांनी 'रण' शब्दांच्या साहाय्याने एक मोठी शब्दमालिकाच तयार केलेली आहे. तिच्यात जुने रूढ सामाजिक शब्द जसे त्यांनी वापरले त्याप्रमाणे नवीन शब्दही तयार केले व त्यांचा प्रसंगोचित वापर केला. उदाहरणार्थ, 'रणपडिपाडी, रणप्रत्युपकार, रणव्युत्पत्ती, रणप्रवीण, रणनोवरा, रणमार, रणोन्मत्त, रणसुरवाड, रणाभिनिवेश, रणभूमी, रणसंतुष्ट, रणविंदान, रणयोद्धा, रणभिदर्प, रणभिघात, रणप्राणांत, रणपाडी, रणकल्लोळ, रणकौतुक, रणख्याती, रणरंगधीर, रणकंदन.'[२] त्याचबरोबर त्यांच्या रचनांमध्ये इतर ठिकाणी आढळणारे रणरांगोळी (रणकंदन), रणगाडा (रणधूर), रणभंगाणी (युद्धातील पराभव), रणनिर्लंड (रणामध्ये नपुंसक) असे आणखी काही शब्द

या संदर्भात पाहता एकाच शब्दाच्या साहाय्याने केलेली निर्मिती ही नाथांची मोठी भाषिक सर्जनशीलता दर्शवते.

मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष यांनी 'भाषाप्रभूंची रेलचेल' या आपल्या लेखात लेखकांनी शब्दांचा सर्जकशोध कसा करावा हे खूप नेमक्या भाषेत (सर्जकतेने) सांगितले आहे. ते लिहितात, 'शब्द गळाला लागण्यासाठी अत्यंत शांतपणे भाषेच्या अथांग महासागरात जाळे पसरून बसावे लागते. एखाद्या भाग्यवंत क्षणी तो शब्द पोहत येतो आणि जाळे पसरणे सार्थकी लागते. कधी हा मामला सत्वरपणे पार पडत नाही. इथेच लेखकाची खरी कसोटी असते. चिल्लर शब्दांची मासळी जाळ्यात गावलेली असतेच. पण ती पुन्हा सागरात फेकून देऊन जाळे हलके करावे लागते, आणि पुन्हा ते पसरावे लागते.'[३]

लेखक-कवींनी वापरलेली सर्जक भाषा सर्वच वाङ्मयप्रकारांमध्ये दिसते. तथापि शब्दपातळीवर दिसणारी सर्जकता कवितेतून अधिक नेमकेपणाने अभ्यासता येईल. कवितेच्या भाषेतील सर्जकता वाचकाला संमोहित करते. उदाहरणार्थ, कवितेमध्ये उन्हे सांडतात, कांती सांडते, अंगाला बहर येतो. पहाट हिवाळी असते, पापणीला पूर येतो, हवा चिंब पावसाळी असते, ऊन चिंब चिंब थेंब असते, झाडे हिरमुसतात, पाय बहकतात. कवी कवितेसाठी अशी भाषा घडवितात. शब्दांची निवड करण्याबरोबर शब्दांची, प्रतिमांची नवनिर्मिती करतात. वरील उदाहरणांमध्ये मानवी वर्तनाचा आरोप निसर्गावर तर निसर्गातील बदलांचा, निसर्गरूपांचा आरोप मानवी वर्तनावर केलेला आहे.

हे नवसर्जन केलेले शब्द कवितेच्या भाषेचे सौंदर्य वाढविण्याबरोबर कवितेला विशेष अर्थ प्राप्त करून देतात. कविता हीच एक सर्जक निर्मिती असली तरी अनेक कवींनी शब्दपातळीवर साधलेली सर्जकता विशेष अभ्यसनीय ठरते. येथे बा०सी० मर्ढेकर यांच्या कवितेमधील असे काही शब्द पाहा : तत्प्रभात, अलिंगणे, छायार्णव, प्रतिमेघ, प्रतिवान, श्रुतिशांत, मन्मनी, समुत्सुक, गतिमत्व, शिशिरागम, शिशिरर्तु, पुनरागमें इत्यादी. हे शब्द मर्ढेकरांनी स्वत:च्या कवितेसाठी घडविलेले आहेत. शब्दपातळीवर घडणारी ही सर्जकता भाषासमृद्धी आणि वृद्धीसाठी पोषक ठरते. या संदर्भात त्यांच्या पुढील काव्यपंक्ती लक्षात घेण्यासारख्या आहेत.

'तुझ्यासाठी देवा । काय म्यां झुरावे,
झुरळाने कैसें। पतंगावे ॥' ('मर्ढेकरांची कविता' : पृ० १००)

'जे साधुसंत परमेश्वराच्या दर्शनासाठी अहोरात्र धडपडले, ज्यांनी सर्वस्व समर्पित केले; त्यांनाही त्याच्या दर्शनासाठी आयुष्यभर तिष्ठत बसावे लागले. तेव्हा माझ्यासारख्या सामान्यांची काय दशा. तुझ्या दर्शनासाठी माझ्यासारख्या सामान्याने झुरणे व्यर्थ आणि निरर्थक आहे. मी झुरळाइतका सामान्य आणि क्षुद्र आहे. झुरळाने किती ठरवले तरी; त्याला पतंगाप्रमाणे आकाशात थोडेच उडता येणार आहे?' हे कवीला येथे सांगायचे

आहे. यासाठी तो 'झुरळाने कैसें। पतंगावे॥' असे पूर्णत: नवा चरण निर्माण करतो. माणसाची तुलना झुरळाशी करणे हे नावीन्यपूर्ण आहे. पुन्हा 'पतंगावे' हा पूर्णत: नवा शब्द घडविणे ही भाषिक सर्जनशीलता आहे. त्यांनीच आपल्या आणखी एका कवितेमध्ये ('आणखी काही कविता' पृ० १६) मनुष्याचे सामान्यत्व वा क्षुल्लकत्व सूचित करण्यासाठी 'मुंगी'सारख्या कीटकाची उपमा घेऊन ते क्षुल्लकत्व प्रभावीपणे व्यक्त केले आहे. या कवितेतील शब्दनिवडीची कल्पकता आणि 'मुंगी' या शब्दाची वारंवारता यामुळे ध्वनित होणारे सामान्यत्व वाचकाच्या मनावर ठसविले जाते. याप्रमाणेच ना०धों० महानोर यांनी खालील काव्यपंक्तींमध्ये 'हिरवा' या शब्दाचा केलेला सर्जनशील वापर भाषिक सर्जनशीलतेचे असेच उत्तम उदाहरण आहे.

'स्वप्न हिर्वळ उतट, गोऱ्या हाती हिर्वा चुडा
हिर्व्या चोळीच्या रंगास हासे अंगठीचा खडा'
('रानातल्या कविता' : पृ० ५५)

येथे हिरवळचे हिर्वळ आणि हिरवाचे हिर्वा-हिर्व्या असे रूपांतरण ही उपलब्ध शब्दाची मोडतोड करून केलेली नवनिर्मितीच आहे. सर्जकतेने वापरलेल्या भाषेतून येथे सौंदर्यनिर्मिती साधली जाते. याप्रमाणेच त्यांच्या या ओळी पाहा :

'निळ्या नभाचा गडद जांभळा हिरवट पार
निळी जांभळी पिवळी शेते अपरंपार
निर्झरिणीची वळणवाट, डोंगरी कपार
सूर्यास्तामधि तांबुस गोरे बुडे शिवार.' ('पानझड' : पृ० ३१)

निसर्गाचे, शेतीचे एका रम्य संध्याकाळी कवीला घडलेले हे दर्शन आहे. निसर्गातील नाना रंग टिपून त्याने येथे नवी भाषा घडविली आहे. 'निळ्या नभाचा गडद जांभळा हिरवट पार', 'निळी, जांभळी, पिवळी शेते अपरंपार', 'तांबुसगोरे बुडे शिवार' अशी रंगसूचक शब्दांची नवनिर्मिती येथे केलेली आहे. या १९ शब्दांच्या कवितेमध्ये नऊ शब्द रंगसूचक आहेत. या शब्दांनीच शेतीचे सौंदर्य टिपले आहे. शेते अपरंपार, निर्झरिणीची वळणवाट, डोंगरी कपार, सूर्यास्तामधि हे शब्द आणि शब्दबंध नव्याने घडविलेले आहेत. कवीला निसर्गदर्शनातून मिळालेली अनुभूती शब्दांच्या या घडणीतून प्रभावीपणे व्यक्त होते. पुन्हा यमक जुळणीसाठी कवीने केलेली शब्दांची निवड लक्षवेधी ठरते.

विलास सारंग यांच्या 'कविता १९६९-१९८४' या संग्रहाच्या छोट्याशा प्रास्ताविकामध्ये 'जगणं-बिगणं' या कवितेविषयी असे लिहिले आहे की, 'ती जगण्याविषयी आहे, तितकीच 'बिगण्या'विषयी-भाषेविषयी आहे. मराठी भाषेचं एक वैशिष्ट्य साजरं करण्याचा, त्याचा शोध घेण्याचा त्यात प्रयत्न केला आहे'[४] या प्रास्ताविकात 'बिगण्या'सारख्या निरर्थक शब्दाला कवी अर्थ देऊ पाहतो आहे. अलगद,

नजर, फुलत, विलग, विरळ, टिकटिक, विझत असे सात शब्द वापरून लिहिलेली त्यांची १४ ओळींची ती कविता जन्मापासून मृत्यूपर्यंतचा प्रवास येथे सूचित करते. नेहमीच्या वापरातील शब्द घेऊन कवीने प्रस्तुत कवितेमध्ये व्यक्त केलेला आशय हा भाषेच्या सर्जनशील वापराचा उत्कृष्ट नमुना आहे. कोणत्याही भाषेचे सामर्थ्य अशा चपखल शब्दांच्या वापरातूनच सिद्ध होत असते.

संदर्भ :

( १ ) कानडे, मु०श्री० :' मराठी शब्दसमीक्षा', सन पब्लिकेशन पुणे, १९८९, पृ० ३४.

( २ ) तत्रैव, पृ० ३०-३१.

( ३ ) राजाध्यक्ष, मं०वि० : 'भाषाविवेक', श्री विद्या प्रकाशन, पुणे, १९९७, पृ० ७५.

( ४ ) सारंग, विलास : 'कविता १९६९-१९८४', मौज प्रकाशन, मुंबई, १९८६, प्रारंभीचे पृष्ठ.

■

**मराठीच्या 'अभिजातते'साठी पुरावे**

मराठवाड्यातील पैठण परिसरात लिहिल्या गेलेल्या 'गाथा सप्तशती' या ग्रंथातील गोदावरी नदीचे पात्र, भोवतालची कापसाची शेती, लोकजीवनाचे वर्णन करणाऱ्या ७०० कवितांबरोबरच अजिंठा-वेरूळ भागातील शिलालेख मराठीच्या अभिजाततेसाठी पुरावा म्हणून वापरले जाणार आहेत. २ हजार २१९ वर्षांपूर्वी 'ब्राह्मी' लिपीत लिहिलेला मराठीतील शिलालेख तसेच 'पैशाची' या प्राकृत भाषेतील 'गुणाढ्याची बृहद्कथा' या ग्रंथातील 'मांजर', 'पोट भरणे' अशा शब्दप्रयोगांचे पुरावे मराठीला अभिजात दर्जा मिळवून देण्यासाठी वापरले जाणार आहेत. पुणे जिल्ह्यातील नाणेघाट येथे जुन्नरजवळ इ०स० पूर्व २०७मध्ये ब्राह्मी लिपीत कोरला गेलेला शिलालेख 'सातवाहनांचा इतिहास' या पुस्तकात उल्लेखलेला आहे. महामहोपाध्याय वा०वि० मिराशी यांनी ब्राह्मी लिपीतील या शिलालेखाची भाषा 'महारठी' असल्याचा उल्लेख केला आहे.

- दै० 'लोकसत्ता', दि० १७ मे २०१२

# ऐतिहासिक भाषाविज्ञान आणि मराठी भाषा

शिवाजी विष्णू पाटील

ऐतिहासिक भाषाविज्ञानाच्या संदर्भात आज अनेक प्रश्न निर्माण केले जातात. जनन, कुल, उत्क्रांती यांसारख्या संकल्पनांना वैज्ञानिक मान्यता मिळालेली नाही. भाषेची पूर्वावस्था शोधत असताना येणाऱ्या अडचणी लक्षात घेता अशा स्वरूपाच्या अभ्यासाची पीछेहाट होताना दिसते. किंबहुना ऐतिहासिक भाषाभ्यासाला भाषाविज्ञानाची शाखा मानायचे की नाही, असा प्रश्नही निर्माण होताना दिसतो. आधुनिक भाषाविज्ञानाचा जनक फेर्दिना द स्योसूर (१८५७-१९१३) या स्विस अभ्यासकाने प्रारंभीच्या काळात ऐतिहासिक भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात मौलिक कामगिरी केली आहे. त्यांनीच एककालिक आणि कालक्रमिक भाषाभ्यास पद्धतीत भेद करून भाषाविज्ञानाला नव्याने चालना देण्याचे महान कार्य केले आहे. साधारणपणे विसाव्या शतकाच्या प्रारंभी आधुनिक भाषाविज्ञानाला सुरुवात झाली आहे.

### सर विल्यम जोन्स यांच्या निबंधातील विधान

सर विल्यम जोन्स यांनी इ०स० १७८६मध्ये कोलकता येथे एशियाटिक सोसायटीच्या वार्षिक अधिवेशनात निबंध वाचला आणि त्यानंतर भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासास चालना मिळाली. त्यांनी निबंधात म्हटले होते : संस्कृत, ग्रीक व लॅटिन ह्या भाषांत जे साम्य आढळते ते इतके घनिष्ठ आणि खोलवर रुजलेले आहे की, त्या साम्याचा खुलासा ते केवळ यदृच्छेने घडून आलेले आहे असे म्हणून भागण्यासारखे नाही. त्या साम्याचा खुलासा करण्यासाठी ही साम्यस्थळे आढळणाऱ्या भाषा कोणत्यातरी एका भाषेपासून उद्भवल्या असल्या पाहिजेत, असे मानावे लागते आणि ही जी संस्कृत इत्यादी भाषांच्या मुळाशी असलेली भाषा मानावी लागते ती आज आपणास बहुधा उपलब्ध नाही. (मेहेंदळे २००५, १४८-१४९) या विधानानेच ऐतिहासिक भाषाविज्ञानाचा पाया घातला गेला.

### ऐतिहासिक भाषाभ्यासाचे स्वरूप

भाषेच्या बदलत्या व प्रवाही रूपांकडे लक्ष देऊन हा अभ्यास केला जातो. एका कालबिंदूपासून दुसऱ्या कालबिंदूपर्यंत भाषेत घडणाऱ्या परिवर्तनाचा इतिहास या पद्धतीत येतो. म्हणून या पद्धतीस ऐतिहासिक भाषाभ्यास असे म्हणतात. या पद्धतीचा अभ्यास दोन कालबिंदूंच्या साहाय्याने केला जात असल्यामुळे द्वैकालिक भाषाभ्यास असेही म्हटले

जाते. ऐतिहासिक भाषाभ्यासाचा विचार करताना सर विल्यम जोन्स यांनी मांडलेल्या सिद्धांताचा विचार केला जातो. साम्यस्थळे आढळणाऱ्या भाषा कोणत्या तरी एका भाषेपासून उद्‌भवल्या असल्या पाहिजेत असे मानून अभ्यास केला जातो. मूळ भाषा नष्ट झाली असेल तर पुनर्रचन-पद्धतीने तिचे स्वरूप शोधून काढले जाते.

प्रारंभी भाषेच्या अभ्यासाकडे धार्मिक दृष्टिकोनातून पाहिले जात होते. संस्कृत भाषा ही देववाणी असून ती श्रेष्ठ आहे, असे मानले जात होते. परंतु नंतर भाषेच्या अभ्यासाविषयी दृष्टिकोण बदलत गेले. पण खऱ्या अर्थाने युरोपमध्ये ही अभ्यासपद्धती एकोणिसाव्या शतकात उदयास आली. या पद्धतीत दोन किंवा अधिक कालखंडातील भाषिक परिवर्तनाचे स्वरूप काय होते, एखाद्या कालखंडात कोणते स्वप्न लुप्त झाले, कोणते स्वप्न नव्याने आले याचा अभ्यास केला जातो. त्याचबरोबर संरचनेत कशा पद्धतीने परिवर्तने झाली, वाक्यांचे स्वरूप कसे बदलत असते, अर्थामध्ये कोणते परिवर्तन झाले यांचाही विचार केला जातो. वैदिक संस्कृत, अभिजात संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, विद्यमान भारतीय भाषा यामधील परस्परसंबंध एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेत जाताना झालेला बदल, स्वप्न व रूपिम यांतील बदल यांचा अभ्यास अभिप्रेत असतो. मराठीच्या संदर्भात ज्ञानेश्वरकालीन मराठीपासून आजच्या काळापर्यंत मराठीचे स्वरूप कसे पालटत गेले, याचा अभ्यास करता येतो. कर्म-कम्म-काम, धर्म-धम्म-धर्म, तृण-तण असे परिवर्तन घडत असते. आज मराठीत 'ऋ' आणि 'ऌ' यांचे झालेले निसरडे उच्चार विचारात घ्यावे लागतात. मराठीत कोणत्या कालखंडात कोणत्या शब्दांची भर पडली, कोणते शब्द मागे पडले, शब्दांना कोणते अर्थ प्राप्त झाले याचा विचार करावा लागतो. कारकून, वकील, सही, चादर, सतरंजी, तालुका, मजला, इमारत इ० फारसी शब्द; बँक, पेन, फोटो, कॉलेज इ० इंग्रजी शब्द असे वेगवेगळ्या भाषेतून मराठी स्थिरावलेल्या शब्दांचा विचार करावा लागतो. शब्दांबरोबरच व्याकरणिक रूपे, वाक्ये यांच्यातील अदलाबदलांचाही अभ्यास यात केला जातो, अशा बदलांचा अभ्यास करून भाषेचे कालखंडानुसार स्वरूप कसे पालटत गेले याची कल्पना दिली जाते. भाषेच्या उत्क्रांतीची कल्पना देणे ऐतिहासिक भाषाविज्ञानात महत्त्वाचे मानले जाते.

ऐतिहासिक भाषाभ्यासामध्ये प्रामुख्याने वेगवेगळ्या भाषांतील समानार्थी शब्दांमधील ध्वनिसंबंधाचा अभ्यास केला जातो. त्यातूनच ध्वनिपरिवर्तनाचे नियम तयार केले जातात. ध्वनिसंबंध असणाऱ्या भाषांचा गट तयार केला जातो. त्यामुळे हा भाषेचा गट कोणत्या एका भाषेपासून निर्माण झालेला आहे, याचा अभ्यास करून आदिभाषेचा शोध घेण्याचे काम केले जाते. संस्कृत, ग्रीक, लॅटिन या भाषांच्या मागे इंडो-युरोपियन ही जनक भाषा असावी अशी मांडणी करण्यात आली. अशा मांडणीतून भाषाकुलाची संकल्पना निर्माण झाली आहे. मराठी भाषेच्या संदर्भात इंडो युरोपियन, इंडो इराणिअन-संस्कृत-

प्राकृत-अपभ्रंश-मराठी अशा क्रमाने मराठीचा वंशवृक्ष सांगितला जातो. एकाच भाषेतील बदलांचा ऐतिहासिक भाषाभ्यास करण्याच्या पद्धतीस एकभाषिक पुनर्रचन असे म्हणतात. हा भूतकालीन अभ्यास असून पुरोगामी व पश्चाद्गामी अशा दोन अंगांनी अभ्यास केला जातो.

**पुरोगामी :** भाषेच्या ज्ञात पूर्वावस्थेपासून तिच्या उत्तरोत्तर अवस्थांचा विकास कसा होत गेला, याची टप्प्याटप्प्याने मांडणी केली जाते, अशा अभ्यासाला 'पुरोगामी' म्हणतात. संस्कृतनंतर प्राकृत-अपभ्रंश-अर्वाचीन अभ्यास भारतीय भाषा या अंगाने असा अभ्यास केला जातो.

**पश्चाद्गामी :** या अभ्यासात भाषेची पूर्वावस्था ज्ञात नाही, हे लक्षात घेऊन वर्तमानातून भूतकाळातील त्या भाषांचा उलट्या क्रमाने तपास केला जातो आणि भाषेच्या पूर्वावस्थेचे पुनर्रचन केले जाते. हे पुनर्रचन केल्यानंतर पूर्वीच्या अवस्थेकडून नंतरच्या अवस्थेकडे येताना भाषेत ध्वनी, शब्द, अर्थ, व्याकरणविषयक कोणते बदल झाले याविषयीची विधाने करावी लागतात. उदा० ग्रीक, लॅटिन, संस्कृत भाषांचा अभ्यास करून त्यांच्या मूळ जनकभाषेचा अंदाज बांधणे शक्य होते.

अनेक भाषांच्या बदलांतील अभ्यास करण्याच्या ऐतिहासिक भाषाभ्यास पद्धतीला बहुभाषिक पुनर्रचन असे म्हणतात. एकाच कुलातील भाषाभगिनींचा अभ्यास यात केला जातो. तसेच वेगवेगळ्या कुलांतील भाषांचाही अभ्यास करता येतो. त्या त्या भाषेतील साम्ये शोधून तपासता येतात. त्यामुळे भाषा वापरणाऱ्या समाजाच्या संस्कृतीचे संबंध तपासणे शक्य होते. त्यातून बंधुता, एकता वाढण्यास मदत होते.

**ऐतिहासिक भाषाविज्ञानाच्या मर्यादा**

- ऐतिहासिक भाषाभ्यास करताना त्या त्या काळातील अभ्याससामग्री जमा करावी लागते. त्या काळातील बोलीभाषा लक्षात घ्यावी लागते; परंतु लिखित भाषेच्या साधनांवर अवलंबून राहावे लागते. त्या काळातील व्यवहार-भाषेचे नमुने गोळा करणे अशक्य होते.
- लिखित भाषिक पुरावा हा महत्त्वाचा मानला गेल्यामुळे त्या अभ्यासात समग्रता लाभत नाही. भाषेच्या मूळ रूपांकडे जाऊन जनक भाषांचे रूप सिद्ध करता येत नाही. त्यामुळे होणारा अभ्यास केवळ पृष्ठस्तरीय ठरतो. आधुनिक भाषाविज्ञानात भाषेचा अभ्यास करण्यासाठी भाषा निरीक्षणयोग्य करून घ्यावी लागते. मग संशोधन पद्धतीचा उपयोग करून भाषेचे विश्लेषण केले जाते. भूतकालीन भाषेचा अभ्यास करताना भाषा निरीक्षणयोग्य करणे अवघड आहे. वर्णनात्मक भाषाविज्ञानातील वस्तुनिष्ठ दृष्टिकोण येथे आढळत नाही. त्यामुळे जनन ही कल्पना भाषांच्या बाबतीत बरीच रूपकात्मक अर्थाने वापरावी लागते.

● आदि-भाषेची पुनर्रचना करताना भाषा एकजिनसी स्वरूपाची मानावी लागते. 'खरे तर भाषा ही अनेक बोलींची बनलेली म्हणजेच बहुविध स्वरुपाची असते. शिवाय परिवर्तनाचे नियम भाषेतिहासाच्या काही टप्प्यांत अधिक लागू पडतात, तर काही टप्प्यांत तितकेसे लागू होत नाहीत, असे आढळते.' (मालशे २००४, २३) त्यामुळे त्या भाषेचे एकजिनसी स्वरूपच लक्षात घ्यावे लागते. प्रत्यक्ष व्यवहारातल्या बोलींचे नमुने मिळत नसल्यामुळे अडचणी निर्माण होतात. त्यामुळे आदिभाषेच्या प्रत्यक्ष अस्तित्वासंबंधी अभ्यासक शंका उपस्थित करतात.

अशा मर्यादा ऐतिहासिक भाषाविज्ञानाला असल्या तरी त्याने भाषिक बदलाचे व त्यामागील नियमित तत्त्वांचे काटेकोर वर्णन देण्यात चांगली प्रगती केली आहे. विसाव्या शतकात अशा अभ्यासाविषयी काही रास्त शंका जरी निर्माण झाल्या तरी भाषेच्या इतिहासात त्याला महत्त्व आहे. मानवी संस्कृतीच्या दृष्टीने तो अभ्यास महत्त्वाचा ठरतो. ऐतिहासिक भाषाभ्यास करीत असताना वर्णनात्मक भाषाभ्यासाचा आधार घ्यावा लागतो. किंबहुना दोन्ही पद्धतीतील भेद नष्ट करून त्या एकात्म केल्या पाहिजेत, असे मत वार्टबर्ग यांनी मांडलेले आहे.

**ऐतिहासिक भाषाविज्ञानाचा नवा आविष्कार**

मध्ययुगीन युरोपमध्ये भाषेविषयी जो दृष्टिकोण प्रचलित होता तो अर्थातच धार्मिक स्वरूपाचा होता व त्याचे मूळ जुना करार या हिब्रू धर्मग्रंथात होते. जुन्या करारातील प्रारंभीचे पुस्तक म्हणजे जेनेसिस. या पुस्तकात बाबल नगराच्या नावाचा उगम सांगण्यासाठी कथा आलेली आहे. ही कथा दिनेश माहुलकर यांनी 'भाषेचे आणि भाषाभ्यासाचे विकसन' याविषयीच्या 'वृद्धिः ...' या पुस्तकाच्या आरंभी सारांशरूपाने दिली आहे. (माहुलकर २००९,१) त्या कथेत पृथ्वी एक, भाषा एक असे म्हटलेले आहे. विश्वनाथ खैरे यांनी या पुराणकथेचे संक्षिप्त विवेचन करून युरोपियन लोकांची या कथेवर श्रद्धा होती असे म्हटले आहे. शिवाय ते पुढे म्हणतात, '१७८३-८६ सालात संस्कृत-ग्रीक-लॅटिन यांचे साम्य विल्यम जोन्स यांच्या लक्षात आल्याबरोबर त्यांनी अशी मांडणी केली की, या भाषा आधीच्या कोणत्या तरी एका मूळ भाषेतून निघाल्या आहेत असे कोणीही भाषाशास्त्रज्ञ म्हटल्याशिवाय राहणार नाही. तसे भाषाशास्त्रज्ञांनी म्हटलेच आणि तिन्ही भाषांच्या एक मूळभाषेची कल्पना गृहीत धरली. कल्पित मूळ भाषेला त्यांनी इंडोयुरोपियन असे नाव दिले. यांसारख्या इतरही भाषांचे संबंध शोधतशोधत भारत-युरोपीय ऐतिहासिक भाषाविज्ञानाची उभारणी झाली.' (खैरे २००७,८) ही उभारणी एका बाबलच्या पुराणकथेच्या आधारावर झाली.

ही पुराणकथा सारांशरूपाने अशी दिली आहे -

अवघ्या धरतीची भाषा एक होती, बोली एक होती. झाले काय की, ते उगवतीकडून

चालत आले, तेव्हा त्यांना शि-नार देशात मैदान मिळाले आणि ते तेथे राहिले. आणि ते आपसात म्हणाले, चला, आपण विटा थापू आणि चांगल्या भाजू. मग त्यांनी दगडासाठी वीट अन् चुन्यासाठी चिखल लावला. आणि ते म्हणाले, चला, आपण नगर आणि मिनार उभारू, मिनारचे शिखर स्वर्गाला पोचावे आणि आपल्याला नाव घेऊ, नाहीतर आपण साऱ्या धरतीच्या पाठीवर विखरून जाऊ. आणि मानवाच्या लेकरांनी उभारलेले ते नगर आणि मिनार बघायला ईश्वर खाली आला. आणि ईश्वर म्हणाला, बघा लोक एकोप्याने आहेत आणि त्यांची भाषा एक आहे आणि त्यांनी हा घाट घातला आहे. आता त्यांनी जे डोक्यात घेतले आहे ते काहीच त्यांना दुर्घट नाही. म्हणून त्यांची भाषा बावळी करू या. म्हणजे त्यांना एकमेकांचं बोलणं कळायचं नाही. मग ईश्वराने त्यांना तेथून साऱ्या धरतीच्या पाठीवर विखुरले आणि त्यांनी नगर उभारणे सोडून दिले. त्याचमुळे नगराचे नाव बाबल पडले, कारण ईश्वराने त्यात साऱ्या धरतीची भाषा बावळी केली. आणि ईश्वराने तेथून त्यांना साऱ्या धरतीच्या पाठीवर विखरून टाकले.

या कथेतील बाबल हे गाव काल्पनिक नाही. सध्या ज्याला इराक म्हणतात त्या देशातल्या प्राचीन संस्कृतीचे हे नगर इंग्रजी बाबिलोन या नावाने ओळखले जाते. परंतु या अनुषंगाने येणारी कथा कल्पकतेने उभारली आहे.

एका मूळ भाषेच्या या संकल्पनेने भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचेही वेगळेच आकलन उभे केले. ग्रीक भाषा बोलणाऱ्यांचा ग्रीस देश आणि संस्कृत भाषेतली वेदसूक्ते रचणारांचा भारत देश यांच्यात हजारो किलोमीटरचे अंतर आहे, यावरून अनुमान निघाले की कल्पित मूळभाषा बोलणाऱ्यांचे निरनिराळे गट मूलस्थानापासून फार पूर्वी बाहेर पडले. त्यातल्या भारतात आलेल्या गटाचे नाव वेदसूक्तात उल्लेख असलेले आर्य असे मानले गेले. आर्य आक्रमकांनी भारतात आणलेली वेदांची संस्कृत भाषा उत्तर भारतातल्या भाषाबोलींची मूळभाषा असे भाषाविज्ञानात नमूद झाले. (टर्नर १९७३, ix)

वरील विवेचनावरून ग्रीक, लॅटिन व संस्कृत भाषेच्या मूळाशी एक इंडो-युरोपियन भाषा आहे, या गृहीताविषयी शंका निर्माण केली जाते. किंबहुना एकोणिसाव्या शतकातील ऐतिहासिक भाषाविज्ञानावर अवलंबून न राहता नव्याने फेरविचार करण्याची गरज निर्माण झाली आहे. तशा स्वरूपात संशोधन होत आहे, ही निश्चित आशादायी बाब आहे. विश्वनाथ खैरे म्हणतात त्याप्रमाणे मुळात मानवजातीची एकटी एक भाषा किंवा बोली होती असे नाही. मानवांचे गट इथेतिथे पुंजक्यांनी राहत असल्याने जितके गट तितक्या अगणित बोली नांदत होत्या. संस्कृत, ग्रीक यांसारख्या अभिजात भाषा अशा काही काही बोलींच्या जोडणीने विकसित झाल्या... एका इंडो-युरोपियन (किंवा संस्कृत देववाणी)मधून अनेक वेगळ्या भाषा निघाल्या या प्रचलित कल्पनेला हा आधुनिक विज्ञानाने दिलेला छेद आहे. त्यामुळे ऐतिहासिक भाषाविज्ञानाची प्रचलित मांडणी

शंकास्पद ठरते. पुढे जाता, संस्कृत भाषा भारतातल्या लोकबोलींमधूनच निघाली असे पर्यायी मानीय मांडता येते. (खैरे २००४, २)

**मराठी भाषेचा उदय**

संस्कृत भाषा भारतीय लोकबोलीतून निघाली, असे विश्वनाथ खैरे यांनी मानले आहे. संस्कृत भाषेला इंडो-युरोपियनच्या गोतावळ्यात टाकून आपण प्रचलित भारतीय लोकभाषा आणि विशेषत: दक्षिणी भाषा यांच्याकडे पाठ फिरवत आहोत, असे त्यांचे म्हणणे आहे. त्याचबरोबर मराठी भाषेचा उदय शोधताना संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश-मराठी ही साखळीही पूर्णपणे मान्य नाही. आज आपण मराठी भाषेतील काही शब्दांच्या उत्पत्ती शोधताना प्राकृत, संस्कृत भाषेकडेच जातो, त्यामुळे अशा उत्पत्तीस एकांगीपणाचा धोका संभवतो. 'ग्रामीण मराठी शब्द संस्कृतातून आलेले नाहीत. ते प्रमाण मराठी शब्दांच्या आधीचे आहेत. त्यांचे समशब्द दक्षिणी भाषांमध्ये आहेत. संस्कृतसारख्याच लांबच्या देशातल्या शब्दांशी लावलेला ग्रामीण शब्दांचा संबंध तपासाअंती टिकत नाही. हे सारे समजून घेतले तर नव्या जमान्यात कोणता अधिक अर्थ भरता येईल ते नीटपणे तपासता येईल.' (खैरे २००४, भूमिका) दक्षिणी भाषांच्या आधाराशिवाय काढलेल्या उत्पत्ती सदोष ठरतात, असे त्यांनी म्हटले आहे. त्यांनी पुढे असे म्हटले आहे की लोकबोलींमधल्या शब्दांचे उद्भ्रंश करून संस्कृतचा शब्दसंग्रह वाढवला असल्याचे दिसते. देवाधर्माच्या कार्यात संस्कृतचा वापर खूपच होत असल्याने, पूजापाठ, विधिविधाने यांतल्या संस्कृत शब्दांशी केवळ ध्वनींच्या आधारावर मराठी शब्दांचा जो संबंध जोडला गेला तो बरोबर नाही. संस्कृतमधून लोकभाषेत शब्द यायला किमान ती भाषा बहुजनांच्या कानी तरी पडली पाहिजे. ती स्त्रीशूद्रांनी ऐकू नये असा प्राचीन दंडक होता. विश्वनाथ खैरे यांनी १९७७ पासून लिहिलेल्या 'मराठी भाषेचे मूळ', 'अडगुलं मडगुलं' अशा पुस्तकांतून हा ठोस विचार मांडून 'संमत' सिद्धांताची मांडणी केली आहे. त्यांनी हा नवा विचार भरपूर पुराव्यानिशी मांडलेला आहे. किंबहुना मराठी भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासाचे नवे दालनच निर्माण केले आहे. हे जर लक्षात घेतले तर मराठीचा उदय व विकास नीटपणे समजून घेण्यास मदत होईल.

**संदर्भ :**

( १ ) खैरे, विश्वनाथ : 'लोकभाषा आणि संस्कृत', संमत प्रकाशन, पुणे, (२००४)
( २ ) खैरे, विश्वनाथ : 'व्युत्पत्तीतले गोंधळ', संमत प्रकाशन, पुणे, (२००४)
( ३ ) खैरे, विश्वनाथ : 'भाषा वेगळ्या झाल्या कशा?', भाषा आणि जीवन, मराठी अभ्यास परिषद पत्रिका, पुणे, (पावसाळा २००७)

( ४ ) टर्नर, आर०एल० : 'ए कंपॅरेटिव्ह डिक्शनरी ऑफ दि इंडो-आर्यन लँग्वेजेस', ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, लंडन, (१९७३) (विश्वनाथ खैरे यांच्या लेखातून उद्धृत)

( ५ ) मालशे मिलिंद : 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन', लोकवाङ्मय गृह, मुंबई, (२००४), पृ० २३

( ६ ) माहुलकर दिनेश द० : वृद्धिः'... राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, (२०००)

( ७ ) मेहेंदळे म०अ० : 'ऐतिहासिक भाषाविज्ञान पद्धती : भूमिका व स्वरूप' हा लेख : 'भाषाविज्ञान : वर्णनात्मक आणि ऐतिहासिक' (संपादक, मालशे, इनामदार, सोमण, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, पृ० १४८-१४९ वरून उद्धृत)

■

**वा०ल० कुळकर्णी यांची अभ्यासू दृष्टी : १**

नियतकालिकांचा, त्यांच्या वाटचालींचा, त्या नियतकालिकाने केलेल्या कामगिरीचा अभ्यास केला पाहिजे याची जाणीव प्रथमतः प्रा० वा०ल० कुळकर्णी यांनाच झाली. अशा प्रकारचा अभ्यास करताना त्या त्या काळाच्या प्रेरणा समजून घ्याव्या लागतात, त्या काळातील दृष्टिकोन समजून घ्यावे लागतात, त्या काळातील शैलीचे विशेष समजून घ्यावे लागतात आणि या सर्वांबरोबरच नियतकालिकांतून लिहिणाऱ्या लेखकांनाही समजून घ्यावे लागते. या साऱ्यांची जाण व्यक्त करीत करीत त्यांनी नियतकालिकांचे अभ्यास केले आणि या संदर्भातील त्यांची पुस्तके पुढच्या पिढ्यांना मार्गदर्शक ठरली. पुढे विविध विद्यापीठांमधून विविध नियतकालिकांचे अभ्यास प्रबंधविषय म्हणून पुढे आले. प्रा० वा०ल० कुळकर्णी यांनी अभ्यासाची एक नवीन दिशा ध्वनित केली, असे नक्कीच म्हणता येऊ शकते. या दृष्टीने त्यांचा 'विविधज्ञानविस्तार' हा ग्रंथ निश्चितच मोलाचा आहे.

[डॉ० नागनाथ कोत्तापल्ले, 'अक्षर वाङ्मय', जानेवारी-मार्च २०१२, पृ० १२३]

# चव्हाटी मांडली भाषा

संतोष शेणई

असं काय बिघडलं की एक भाषा नष्ट झाली,
ती आपल्यातील खऱ्या-खोट्या दुनियेसह दफन केली गेली,
शब्द नाही उरले मागे
दुनिया तिच्यासाठी थांबली नाही
बोआच्या दुनियेसाठी
कुठेही कोणीही रडलं नाही...

बाबुई आणि अर्जुन जाना यांनी ही कविता रचली आहे. बोआसाठी. अंदमानमधील बो ही भाषा जाणणारी बोआ नावाची महिला मृत्यू पावली आणि एक अंदमानी भाषा नष्ट झाली. तिची आठवण वडोदरा (बडोदा) येथे जमलेल्या सर्वांनाच झाली.

भाषेमुळे संवाद साधता येतो. भाषा हे अभिव्यक्तीसाठी अत्यंत उपयुक्त साधन आहे. भाषेमुळे व्यवहार करता येतो. यापेक्षा आणखी एक गोष्ट आहे, ती म्हणजे काही जमातीत भाषा हा त्यांचा 'लॉगिन पासवर्ड' आहे. त्या जमातीतील कोणतीही गोष्ट त्या भाषेच्या सांकेतिक रूपात बंदिस्त असते. ज्याला ती भाषा येते तो आपला आहे, त्याच्याशी व्यवहार करायला हरकत नाही, ही त्या समूहाची पक्की धारणा असते. एक प्रकारची सुरक्षा साधण्यासाठीच हा लॉगिन पासवर्ड असतो. या बोलींची उपेक्षा टाळत भाषा जपण्याचं काम देशभर सुरू आहे. भाषेवर प्रेम करणारे, भाषांचा अभ्यास करणारे, भाषाविज्ञानात तज्ज्ञ असलेले आणि आपल्या क्षेत्राशी भाषेचा उपयोग ताडून पाहणारे असे सगळेच 'भाषा वसुधा'च्या निमित्ताने वडोदऱ्यात जमले होते. गुजराती आदिवासी सायंकाळी चव्हाट्यावर जमून गप्पा करतात, त्याला 'चोत्रो' म्हणतात. भाषा वसुधाच्या निमित्ताने जगभरच्या नऊशे भाषांच्या प्रतिनिधींनी आपल्या भाषेची कैफियत चव्हाटी मांडली होती. या आंतरराष्ट्रीय भाषा परिषदेत देशातील सर्व राज्यातील प्रतिनिधी होतेच; पण श्रीलंका, पाकिस्तान, बांगलादेश, भूतान, तिबेट, इंडोनेशिया, दक्षिण आफ्रिका, न्यूझीलंड, ऑस्ट्रेलिया, फ्रान्स, स्वीडन, जर्मनी, केनिया, नायजेरिया, कॅनडा, आयर्लंड, बोलिव्हिआ, इंग्लंड, डेन्मार्क येथूनही भाषातज्ज्ञ सहभागी झाले होते.

वडोदऱ्यातील अकोटा भागात सर सयाजीराव टाऊन हॉलमध्ये या परिषदेची सुरुवात झाली. शहरालगतच्या दशरथ ग्राममध्ये या परिषदेची चर्चासत्रे झाली आणि तेजगढ

येथील आदिवासी अकादमीच्या परिसरात समारोप झाला. डॉ० भालचंद्र नेमाडे यांचे परिषदेची पायाभरणी करणारे बीजभाषण आणि नारायणभाई देसाई यांचे परिषदेला शिखरावर नेणारे भाषण ही दोन्ही भाषणे चर्चा व चिंतनाला वाव देणारी होती. किंबहुना या दोन भाषणांभोवतीच सगळ्या गप्पा रंगत गेल्या. येथे भाषेसाठी केवळ गळा काढणारी माणसे नव्हती. आपापल्या पातळीवर काही तरी कार्य करणारी मंडळी होती. परिषदेच्या सुरुवातीलाच पंधरा राज्यातील भाषांच्या लोकसर्वेक्षणांची पुस्तके प्रकाशित झाली होती. देशभरातील सुमारे २५० कार्यकर्त्यांनी आपला वेळ देऊन ४००हून अधिक भाषांचे सर्वेक्षण पूर्ण केले होते. (महाराष्ट्रातील भाषांचा खंड पद्मगंधा प्रकाशनाने तयार केला आहे. या खंडासाठी स्वतः प्रकाशक अरुण जाखडे खूप मेहनत घेत होते.) त्यामुळेच येथील सर्व गप्पांना प्रत्यक्ष कामाचे पाठबळ होते. तसेच, बोली व भाषा असा वर्चस्ववादी फरकही या गप्पांतून गळून गेला होता. एखाद्या जनसमूहाच्या समाजजीवनाची धारणा करते ती भाषा, ही साधी समज या साऱ्या गप्पा-चर्चा, सर्वेक्षणांत होती.

'भाषा आणि सत्ता' हे सूत्र घेऊन बोलणाऱ्या नेमाडे यांचे भाषण नेहमीप्रमाणेच आपल्या प्रतिपादनाला पुढच्या चर्चेचा केंद्रबिंदू मिळवून देणारे होते. त्यातील दोन विधानं अधिक महत्त्वाची वाटली. ती म्हणजे, 'भाषेने टिकविण्यासाठी विस्तारवादी झाले पाहिजे' आणि 'दुसरी भाषा बोलायचीच नाही, हा भाषा टिकवण्यासाठीचा एक मार्ग असू शकतो.' ''एखाद्या भाषेतील साहित्य अभिजात ठरते किंवा एखादी भाषा मृतप्राय होऊ लागते, यामागे भाषिक कारणेच आहेत की, लष्करी शक्ती, राजकीय सामर्थ्य वा आर्थिक सत्ता यांच्याच बळावर भाषा पुढे वा मागे जातात? लष्करी, राजकीय, व्यापारी सत्तेमुळेच सामाजिक शक्ती वाढून भाषा बलवत्तर होते, हे जगभरातील उदाहरणांवरून दिसते. भाषेच्या विस्ताराला सत्ता कारणीभूत ठरली आहे, म्हणून टिकायचे असेल तर भाषेने विस्तारवादी झाले पाहिजे.'' हे प्रतिपादन करताना, प्रदूषित मूल्यव्यवस्था, वैविध्यातील समाधान, इतिहास घडून गेलेला असणं आणि त्यातील काही इतिहास स्मृतीतूनही हद्दपार झालेला असणं - यांच्याशी आता जोडून घेण्याचा प्रयत्न, लोकशाहीतील बहुसंख्या तत्त्वाशी भाषासमूहांच्या राजकारणाचा असलेला मूलभूत भेद अशी सूत्रे नेमाडे यांनी मांडली. भाषणाच्या अखेरीस भाषा टिकवण्याचा एक जालीम उपाय सुचवला, तो म्हणजे आपापली भाषा वाचवायची असेल, तर केवळ आपल्याच भाषेत बोलणं आवश्यक आहे. दुसरी भाषा बोलायचीच नाही.

या प्रकारच्या प्रतिपादनाची दुसरी बाजू नारायणभाई देसाई यांनी त्याच सायंकाळी मांडली. 'अहंकार नव्हे, तर प्रेम हाच आपापल्या अस्तित्व-संघर्षाचा मार्ग असतो', हे त्यांनी दाखवून दिले. ते म्हणाले, ''बोली आणि भाषा यांच्यामध्ये वैर नाही. बोलीच भाषेला बळकट करतात. बोली नसल्या तर भाषाही दुबळी होणार. बोलींची उपेक्षा

करणाऱ्या भाषा आत्महत्येकडे जातील. एकारलेपण भाषेला हानिकारक आहे. लोकविद्येच्या प्रवाहाला विसरलो तर अन्य विद्याही अपुऱ्या ठरतील. भाषेचा संबंध पूर्ण संस्कृतीशी असतो. तो केवळ साहित्य, कला, संगीत यांच्यापुरता नसतो, तर लोकांच्या व्यवहाराशी, जीवनशैलीशी असतो. पण आपण हा संबंध विसरून लोकजीवनातील विविध रूपांशी संबंधित शब्द हरवत चाललो आहोत. सत्तेच्या घमेंडीतून उद्धटपणा येतो; पण तेथेच आत्मविश्वास कोलमडतो. साम्राज्यवादी दृष्टी आपल्यात नसावी. अशा दृष्टीमुळे जीवनातील वैविध्यता आपण गमावून बसू.'' या दोन भाषणांच्या मध्ये बरीच चर्चा झाली. श्रीलंकेतील खासदार व साहित्यिक राजीव विजयसिंहा यांनी सिंहली व तमीळ यांच्यातील संघर्षांच्या संदर्भात कबुलीच दिली की, 'सत्तेने भाषेचे वर्चस्व वाढवण्याचा प्रयत्न करणे हानिकारक आहे. आपापलीच भाषा खरी, या खोट्या अस्मितेने आमच्या देशाचे, दोन्ही समूहांचे अतोनात नुकसान झाले.' बांगलादेशचे साहित्यिक डॉ० झईद अख्तर यांनी बहुभाषिकत्वाचा आदर केला पाहिजे अशीच भूमिका मांडली. भाषा-अभ्यासक रमाकांत अग्निहोत्री यांनी भाषिक अस्मितावादाचा भाषा टिकवण्याशी संबंध नसल्याचे सांगत, भाषा व संवाद यांचा परस्परसंबंध ओळखला पाहिजे, असे स्पष्ट केले. साहित्य अकादमीचे सचिव अग्रहरा कृष्णमूर्ती यांनी 'भाषा ही संस्कृतीचा पायाभूत घटक आहे' हे आग्रहाने सांगितले. ''लोक आणि त्यांची भाषा यात फरक करता येणार नाही. जैवविविधतेइतकंच भाषांमधलं वैविध्य जपावं लागेल. लिपी नाही म्हणून भाषांचे नुकसान झाले हे खरे असले, तरी या नुकसानीपेक्षा उसन्या लिपींमुळे झालेला फायदा महत्त्वाचा आहे की नाही?', असा प्रश्न शेखर पाठक यांनी विचारला. श्री० पाठकांनी हिमालयीन भाषांच्या अभ्यासासाठी लडाखपासून भूतानपर्यंतचा परिसर चार वेळा पिंजून काढला आहे. भूतानच्या भाषा केंद्राचे संचालक लिआटेन गेंटसो म्हणाले, ''समाज जगवून, समाजाचा विकास करून त्यांची भाषा टिकवली पाहिजे. प्रत्येक भाषेपुढच्या समस्या निरनिराळ्या असतील, त्याला एकच एक रामबाण उपाय लागू होणार नाहीत. त्या त्या भाषेतील समस्येवरचे उपाय त्या त्या समूहातूनच आले पाहिजेत.

डॉ० गणेश देवी यांच्या कुशल संघटनशक्तीने २०१०मध्ये आयोजित केलेल्या 'भाषा संगम'साठी ही मंडळी एकत्र आली होती. जानेवारी २०१२मध्ये 'भाषा वसुधा'साठी पुन्हा जमली. २०१३मध्ये दिल्ली येथे ही मंडळी पुन्हा एकदा 'भाषा नाऊ'मध्ये एकत्र येतील. त्या दिवशीच जगातील प्रत्येक देशातील महत्त्वाच्या गावात आणि भारतातील प्रत्येक राज्यातील एका गावात ही परिषद होणार आहे. गेल्या पन्नास वर्षांत चारशेहून अधिक भाषा नष्ट झाल्या आहेत. ही संख्या वाढू नये यासाठी हा सगळा खटाटोप आहे.■

[दि. ६ ते ९ जानेवारी २०१२ दरम्यान वडोदरा (बडोदा) येथे झालेल्या आंतरराष्ट्रीय भाषा परिषदेचे वृत्तांकन]

# इशालू

ब्रह्मानंद देशपांडे

साक्षेपी संशोधक प्रा० मा०ना० आचार्य यांचा 'ध्वनिताचें केणें' हा संशोधनपर लेखांचा संग्रह प्रकाशित झाला आहे. (२००८). यात ते लिहितात, 'या दृष्टीने पिशाचार्दींचे पुढील काही उल्लेख लक्षणीय आहेत. (ज्ञान०, ५.५७) ---- तसाच तो 'इसालू' म्हणजे ब्रह्मराक्षस. विवसी जशी द्रव्यनिधी सोडीत नाही तसाच हा इसालु धरले घर सोडत नाही. म्हणूनच तेराव्या अध्यायात ज्ञानी मनाला इंद्रियांच्या ओढीपासून कसा जपतो हे सांगताना ज्ञानदेव म्हणतात-

आणि इसालु जैसा घरा । का दंदिया हातियरा।
ना विसंबे भांडारा । बद्धकु गा ॥१३.५००॥

(मा०ना० आचार्य, 'ध्वनिताचें केणें', पृ० ८३)

येथे श्रीज्ञानेश्वरमहाराज इसालू, दंदिया बद्धक अशी उपमाने उपयोजितात. यातील दंदीया (दंदी, द्वंद्वी) म्हणजे भांडखोर. साहजिकच लोक त्याचे 'वोखटे' करायला टपलेले असतात. म्हणूनच श्रीचक्रधर सांगतात -

सिंदी : नदी : दंदी यांचेया गावी न वसावे :

(म्हाइंभट, 'लीळाचरित्र', सं० वि०भि० कोलते, तिसरी आवृत्ती, उत्तरार्ध लीळा, २५८)

केशिराजकृत 'दृष्टांतपाठा'त दंदियाचा दृष्टांत आहे. तो असा :

''कव्हणु एकु जगाचा दंदिया असे : ते मारीती म्हणौनि सदर्था बळियासी शरण रीगे :

साहजिकच हा दंदिया हातियरा विसंबत नाही. शस्त्र सोडत नाही. (केशिराजकृत 'दृष्टांतपाठ', सं० ह०ना० नेने. दृष्टांत क्र० ७४, पृ० ३८)

तसाच इसालु म्हणजे इर्षालू. म्हणजे सतत ईर्ष्या करणारा. ज्ञानेश्वरी शब्दकोशात हाच अर्थ दिला आहे.

(श्रीज्ञानेश्वरी, महाराष्ट्र शासनप्रत, शब्दकोश, पृ० ६९४)

श्रीचक्रधर म्हणतात, 'एथिचे व्यसन जयाचे नि प्रतिबंधे तेयालागि हे इषाळुवांचे इषाळुः (उत्तरार्ध लीळा १३४). केशिराजकृत दृष्टांतपाठात इसाळुवाचा दृष्टांत आहे. तो असा -

कव्हणी एकु इसाळु असे : तो आपुळीए
स्त्रीएसि आज्ञा करी : तंव तीएचे दारावरुनि वऱ्हाड जाए :
सेजीया साईलीया असतितिया पाहो एति : ते सेजीया साइलीया ते पुसे :
हा वो : नोवरी केव्हढी असे : कैसी असे : काइ लेइली असे :
काइ नेसली असे : नोवरा केव्हडा असे : कैसा असे :
काइ लेइली असे : काइ नेसला असे : तिया म्हणती :
एसिना कां : भिती आडौनि पाहे : ते म्हणे ना वो आइ :
माझेनि वरैने मज आज्ञा केली असे : ना तो काइ तू ते
भीती आडौनि देखतु असे : ना : तेयाचि दृष्टि ते
मजचि वरी असे :
आता इशालू घर का सोडत नाही ते कळावे. तो ब्रह्मराक्षस नव्हे.

■

**ग्रंथालय चळवळ**

ग्रंथालय-चळवळीतील एक कार्यकर्ते भास्कर आर्वीकर यांनी ग्रंथालय-चळवळीचे तीन टप्पे सांगितले आहेत. (१) स्वातंत्र्यपूर्व काळात ग्रंथालय स्थापण्याचा उद्देश हा बौद्धिक भूक भागविणे आणि सामाजिक प्रबोधन करण्यापलीकडे राष्ट्रीय व्यक्तिमत्त्व निर्माण करणे हा होता. (२) १९८०पर्यंत सामाजिक जागृतीबरोबरच साधारणतः ग्रंथालये ही माहिती निर्माण होण्याची केंद्रे असावीत, त्याचबरोबर लोकांना सकस साहित्य वाचायला मिळावे, या विचाराने स्वयंसेवी वृत्तीने ग्रंथालये चालविली गेली. (३) १९८०नंतरचा टप्पा मात्र मोठा विचित्र वाटतो. ग्रंथालयांच्या अनुदानात चौपट वाढ झाली. ९०% अनुदान शासन देते. त्यामुळे खेड्यापाड्यांत अनेक ग्रंथालये निर्माण झाली. सार्वत्रिक विस्तार होण्याचा हा काळ होता. वाचनाची आवड वाढली. चळवळ फोफावली. परंतु या विस्ताराच्या काळात ज्या अपप्रवृत्ती वाढल्या. त्यामुळे संपूर्ण चळवळच गिळंकृत होते की काय, अशी भीती आर्वीकर व्यक्त करतात. ग्रंथालये ही खेड्यापाड्यांतील निरुद्योगी माणसाला उत्पन्नाचे एक साधन निर्माण करण्याची संधी वाटू लागली. यातूनच पुढे विचित्र कोंडी निर्माण झाली. अर्थात यात काही चांगले कार्य करणाऱ्या संस्था व व्यक्ती आहेत, याचाही आर्वीकर आवर्जून उल्लेख करतात.

- श्याम देशपांडे, दै० 'लोकसत्ता', दि० २४ एप्रिल २०११

# केळकरांचा आत्मपट : एक वैचारिक अनुभूती

मृणालिनी शहा

[ परीक्षित डीव्हीडी : अतुल पेठे प्रॉडक्शन, पुणे निर्मित, डॉ० अशोक केळकर : व्यक्ती आणि विचार : आत्मपट, डीव्हीडी/६८ मिनिटे. मूल्य ₹१००]

अतुल पेठे प्रॉडक्शनने समाजातल्या विविध क्षेत्रांत पथदर्शी काम करणाऱ्या व्यक्तींची ओळख करून देणारा एक प्रकल्प हाती घेतला आहे. या प्रकल्पातील डॉ० अशोक केळकर (आंतरराष्ट्रीय स्तरावरील भाषेचे वैज्ञानिक, मराठी अभ्यास परिषदेचे संस्थापक अध्यक्ष) यांच्यावर आधारित हा माहितीपट आहे. यामध्ये केळकरांच्या जीवनातील महत्त्वाचे वैयक्तिक तपशील आणि त्यांच्या विचारांची विविधता जाणून घेण्याचा प्रयत्न पेठे यांनी केला आहे. आपला आणि पर्यायाने समाजाचा बौद्धिक 'ऐवज'च पेठे यांनी जपून ठेवला आहे. या महत्त्वाच्या कामाचे स्वागत प्रारंभीच करायला हवे. सुरुवातीला येणाऱ्या श्रेयनामावलीमध्ये संपादक म्हणून सुजाता शेणई आणि अतुल पेठे यांची नावे असली तरी ते दोघेही या आत्मपटात दिसत नाहीत. दिसतात ते एकटे डॉ० अशोक केळकरच. फक्त एकदाच ओझरते दर्शन होते ते त्यांच्या पत्नी दिशाताई यांचे. यात केळकरसर प्रेक्षकांशी बोलत आहेत. तेही स्वत:च्या लेखनाच्या टेबलावर बसूनच. ह्या त्यांच्या संवादात ते आत्मचरित्रच सांगत आहेत, म्हणूनच या माहितीपटाला 'आत्मपट' असे अतुल पेठे यांनी म्हटले आहे ते उचित वाटते. या संवादात मधूनमधून निवडक छायाचित्रे दिली आहेत. त्यांचे जुने घर, लहानपणातील छायाचित्रे यामुळे त्या आत्मपटाला दस्तऐवजी करणारे रूप प्राप्त झाले आहे.

या आत्मपटाचे पाच-सहा कामांमध्ये विभाजन केले आहे. पहिल्या भागात सरांनी, विद्यार्थ्यांच्या आग्रहासाठी डॉ० अशोक रा० केळकर हाच 'विषय' घेऊन त्यांच्याशी गप्पा मारल्या आहेत. सरांना भाषा, चिन्हमीमांसा, साहित्य, तत्त्वज्ञान, कला, संस्कृती इत्यादी विषयांमध्ये रस आहे. त्या गप्पांच्या ओघात 'मी कोण आहे?' असा प्रश्न ते स्वत:ला विचारतात आणि पहिला भाग संपतो. हा असा भारतीय तत्त्वज्ञानाच्या मुळाशी असणारा प्रश्न विचारल्यामुळे अतुल पेठे यांच्या दिग्दर्शन-कौशल्याची ओळख होते, व संवाद-लेखकाच्या कौशल्याचीही. व्यासंगी प्राध्यापक रामचंद्र केळकर हे सरांचे वडील. त्यांची आईदेखील कर्वे यांच्या शाळेत शिकलेली होती. त्यांच्याकडून सरांकडे जिज्ञासूवृत्तीचा वारसा आला. केळकरांना चौथ्या वर्षापर्यंत चालताही येत नव्हते.

तेव्हापासून ते एक पाय ओढत चालायचे. (सर वॉकरला धरून अभ्यासिकेतून हॉलमध्ये येत आहेत. असे चित्रित करून पेठे यांनी त्यांचे अपंगत्व अत्यंत सौम्यपणाने प्रेक्षकांना दाखवले आहे.) पण या अधुत्वामुळे लहानपणापासून त्यांना वाचायची सवय लागली. त्यातूनच पुढे एक बुद्धिजीवी संशोधक, समीक्षक आणि विचारवंत तयार झाला.

केळकरसरांच्या आयुष्यात दोन बौद्धिक स्थित्यंतरे झाली. त्यांच्या वाचनात एकदा दि०के० बेडेकर यांचे हिंदी लेख आले, आणि ते भारावून गेले. मग केळकर त्यांच्या घरीच जाऊन धडकले. सुंदर चर्चा झाली. पुढे मैत्रीही झाली. रा०प० नेने हेही त्यांचे परममित्र. या दोघांच्यात होणाऱ्या चर्चांची फक्त कल्पनाच आपण करू शकतो. हे झाले पहिले स्थित्यंतर. दुसरे स्थित्यंतर म्हणजे डेक्कन कॉलेजचे डॉ० कत्रे यांनी भाषाशास्त्रातील प्रकल्प सुरू केले होते. केळकरांना लहानपणापासून भाषेमध्ये जिज्ञासा होती. त्यामुळे फर्ग्युसनमधून ते डेक्कन कॉलेजमध्ये प्रारंभी विद्यार्थी आणि नंतर अध्यापक म्हणून रुजू झाले. त्यांनी अमेरिकेत जाऊन पीएच०डी० केली. नंतर दिशाताईंशी लग्न केले. दिशाताई या फक्त गृहिणी नव्हत्या. हा आत्मपट असल्यामुळे यात दिशाताईंबद्दल फार कमी बोलले गेले आहे. त्यांना 'गृहिणी सचिव-सखी' असा ग०दि० माडगूळकर पुरस्कारही मिळाला होता. प्रापंचिक जबाबदाऱ्या पार पाडताना केळकरांना एका नैसर्गिक उत्पातालाही तोंड द्यावे लागले. तो उत्पात म्हणजे पानशेतची धरणफुटी. सरांची कितीतरी पुस्तके, दुर्मीळ ग्रंथ आणि महत्त्वाची टिपणे यांची त्यात धूळधाण झाली. ही धरणफुटी मानवनिर्मित होती आणि सरकार ते सर्व झाकण्याचा प्रयत्न करत होते, हे पाहून केळकरांना उद्वेग आला. कुठल्या समाजात आपण राहतो आहोत? मी कोण आहे?; असा प्रश्न पुन्हा पुन्हा सरांना पडणे स्वाभाविकच वाटते.

'मी आणि भाषाविज्ञान' या भागापासून केळकरसरांची केवळ वैचारिक वाटचालच दिसून येते. आणि ती ऐकत असताना दमछाक होते. ते स्वतःला 'भाषाविद' म्हणतात. मराठी, हिंदी, इंग्रजी आणि फ्रेंच या भाषा उत्तम रीतीने अवगत असणाऱ्या सरांनी लेखनासाठी हिंदी, इंग्रजी आणि मराठी असे त्रिभाषासूत्र स्वीकारले आहे.

त्यांची पुस्तके म्हणजे बुद्धीला खाद्य असते. सामान्य विद्यार्थ्यांना तर त्यांच्या पुस्तकातील भाषाच सुरुवातीला समजत नाही, इतकी ती विचारयुक्त असते! येथे केळकरसरांमध्ये भाषेविषयीची जिज्ञासा कधी निर्माण झाली आणि त्यांच्या चौथ्या इयत्तेपासून तिची पूर्तता त्यांच्या शिक्षकांनी कशी केली, याचा वृत्तांत थोडक्यात ते स्वतःच सांगतात. त्यांच्या सरांनी त्यांना 'फिलॉसॉफी ऑफ लँग्वेजेस्' आणि 'फिलॉसॉफी ऑफ ग्रामर' ही पुस्तके वाचायलाच दिली. सरांच्या शब्दात जणू अलिबाबाची गुहा उघडली आणि त्यातच त्यांचा मुक्काम झाला. डेक्कन कॉलेजला ते गेले तेव्हा या सर्व कल्पना घेऊनच ते गेले होते.

'भाषा संज्ञापन' या विभागात संज्ञापन कसे होते हे जणू काही समजावूनच सांगितले आहे. त्यासाठी त्यांनी कवी दया पवारांचे उदाहरण दिले आहे. लहान मुलाला 'पाणी' या शब्दाचा अर्थ कळतो. पाणी, ज्याला रंग नाही असे, ते कधी कधी आकाशातून पडते वगैरे तपशीलही नंतर कळतात. परंतु दया पवारांनी एकदा शब्दांच्या ओघात 'आमच्या मुलांच्या पाण्याला हिरवा रंग असतो' असे सांगितले. 'ते पाणी मिळवायला बरीच मिनतवारी करावी लागते', असेही पुढे जाऊन सांगितले होते. पाण्याचे हे ज्ञापन कळल्यानंतर ते जग कळते, असे केळकर म्हणतात. संज्ञापनामुळे तो समाज कळतो. अशा दोन-तीन पायऱ्या ओलांडल्यानंतर शब्द, त्यांचे अर्थ कळतात. भाषाव्यवस्था आणि भाषाव्यवहार यांच्यामध्ये अंतर करावे लागते, नेहमी ऐकलेल्या शब्दांचा खरा अर्थ कळतो. हे सर्व माणूस बोलतो तेव्हाचे झाले. तो लिहितो तेव्हाचे काय? याचेही सुस्पष्ट विवेचन येथे दिले आहे. ते वाचकांनी स्वतःच वाचावे आणि विचार करावा असे आहे.

'ह्या भाषेचे व्यावहारिक काही अंग आहे की नाही?' असा प्रश्न संवादकर्त्याने सरांच्या तोंडी घालून त्याचे समाधानकारक उत्तर मिळवले आहे. येथे सरांनी शिक्षणाचे माध्यम स्वभाषा असावे की इंग्रजी? या प्रश्नाचे उत्तरही दिले आहे. शालेय शिक्षण हे स्वभाषेतून व्हायला हवे तसेच उच्चशिक्षण हे इंग्रजी माध्यमातून हवे, असे आपले विचार त्यांनी ठाशीव पद्धतीने मांडले आहेत. 'शालेय शिक्षणाच्या माध्यमा'चा विचार अतिरेकी टोकाला जाऊन करू नये, असा सल्लाही द्यायला ते विसरत नाहीत. तसेच परकीय भाषा शिकताना किंवा शिकवताना ती एक वरच्या प्रकारची साक्षरता आहे, हे विसरू नये, याचा ते आग्रह धरतात. त्यांच्यामते परकीय भाषेत बोलण्याचा सराव करावा, जुन्या पाठशाळेत 'संथा' करायला लावायचे तीच पद्धत येथे वापरावी, त्यामुळे परकीय उच्चाररूपे आणि क्रम डोक्यात बसतात.

या गंभीर चर्चेनंतर सरांचा आवडता विषय येतो तो म्हणजे 'भाषा, साहित्य, कला आणि मी'. सरांचे 'रुजुवात' हे पुस्तक ज्यांनी वाचले आहे - पचवले आहे, त्यांना हा भाग ऐकण्यासारखाच आहे. साहित्य ही कला आहे तर साहित्यकृती ही 'कृती' आहे. साहित्याचे माध्यम 'भाषा' असते असे काही लोक मानतात. पण त्यांच्या मते भाषा हे साधनद्रव्य आहे; त्यात आशयद्रव्य मिसळले की त्यात रंग दिसतात, पोत दिसते. ते सहित होतात म्हणून त्याला साहित्य म्हणतात. या साहित्यातून वर्तमानाचा वेध घेता येतो. तसेच त्यातच काही वेळा नाट्यात्मकता असते, कथनात्मकता तर असतेच असते. यातून कलासिद्धी होते. हा साहित्याचा कलात्मक भाषाव्यापार असतो. 'वाङ्मय' या संकल्पनेचा अर्थ केळकरांना अभिप्रेत आहे, तो असा : भाषा व्यवहारात असा एक भाग असतो; ज्याची पारायणे केली जातात. पोथीची पारायणे येथे अर्थातच अपेक्षित नाहीत. काही कवितांची पारायणे केली जातात. वाङ्मयातील 'उषःसूक्त', 'पृथ्वीसूक्त'

ही उत्तम काव्याची उदाहरणे. त्यांचे रूप संमिश्र असते, असे केळकर विचारपूर्वक मांडतात.

ही सर्व मीमांसा केल्यानंतर दिग्दर्शक नेहमीप्रमाणे त्यांना तुम्ही साहित्याकडे कसे वळलात? असा प्रश्न विचारत असावेत. केळकरसरदेखील अत्यंत उत्साहाने त्याचे उत्तर देतात. प्र०के० अत्रे यांची पाठ्यपुस्तके याला कारणीभूत आहेत. त्यांच्या शाळेतील शिक्षकही उत्साही आणि साहित्यात रस असणारे होते. महाविद्यालयात ग०प्र० प्रधानसरांसारखे अध्यापक मिळाले होते. त्यांच्याकडून केळकरांनी एक महत्त्वाचा धडा घेतला. तो म्हणजे फक्त साहित्यप्रेमी होऊन चालत नाही तर साहित्याकडे पाहण्याची चिकित्सक दृष्टीही प्राप्त करून घ्यावी लागते. आपल्या समीक्षापद्धतीचा विचार त्यांनी भाषेप्रमाणेच 'पश्यन्ति', 'मध्यमा' आणि 'वैखरी' या तीन टप्प्यांच्या आधारे आपल्या पुस्तकांतून केला आहे. महाविद्यालयातील व्याख्यात्याने वाचावेच असे त्यांचे छोटेखानी पुस्तक म्हणजे 'कवितेचे अध्यापन' हे होय.

सर्वात शेवटी अत्यंत महत्त्वाचा भाग येतो तो म्हणजे 'विचारजीवी म्हणजे काय?' केळकरांची पत्नी एके दिवशी त्यांना म्हणते, ''काय हो, हल्ली गल्लोगल्ली विचारवंत झाले आहेत. नाहीतर तुम्ही!...'' वगैरे वगैरे. मी स्वतःला विचारवंत समजत नाही, तर मी एक विचारजीवी आहे.' असे ठामपणे सांगणारे डॉ० अशोक केळकर या भागात आपल्याला भेटतात. पुढे जाऊन ते म्हणतात, ''मल्लिकार्जुन जसे संगीतात राहतात तसा मी विचारांत राहतो.'' सरांची 'विचारजीवी' ही संकल्पना नवनिर्मित आहे.

असे हे डॉ० केळकर मात्र मनातून काही बाबतीत उदास आहेत. शिक्षणाचा प्रसार झाला; पण गुणवत्ता वाढली नाही. स्वातंत्र्य मिळाले; पण फाळणीचा उत्पात झाला, गांधीजींचा खून झाला. अशी प्रत्येक बाबतीत काहीना काही उदासी वाटतेच आहे.' 'आहे मनोहर तरी, परि गमते उदास' अशी अवस्था झाली आहे. शेवटी त्यांना चार्ल्स डिकन्सच्या 'टेल ऑफ टू सिटीज' या पुस्तकातील एक उतारा वाचून दाखवला आहे.

या अशा एका उंचीवर जाऊन हा आत्मपट संपतो. प्रेक्षक आणि श्रोते विचारांमध्ये बुडून जाऊन स्तब्ध होतात. एक चांगला आत्मपट पाहिल्याचे समाधान त्यांना नक्कीच मिळते. एक वैचारिक अनुभूती मिळाल्याचा आनंदही मिळतो. ■

**श्रद्धांजली**

झाडीबोलीचे अभ्यासक **डॉ० हरिश्चंद्र बोरकर**, मध्ययुगीन मराठी साहित्याचे अभ्यासक **डॉ० र०बा० मंचरकर** व संत साहित्याचे अभ्यासक **डॉ० मु०श्री० कानडे** यांचे नुकतेच निधन झाले. परिषदेतर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली.





अनुक्रमणिका

# नवीन सदराच्या निमित्ताने

परभाषेतील शब्दांसाठी मराठी प्रतिशब्द घडवणे हे एक आव्हान असते, असा नेहमी अनुभव येतो. प्रतिशब्दांची निर्मिती करण्याच्या प्रक्रियेत जाणकारांची मदत घेणे, त्यांचे अभिप्राय व सल्ला घेणे हे महत्त्वाचे व उपयुक्त ठरते. साहजिकच, मराठी अभ्यास परिषदेच्या परिवारात असलेल्या व विविध क्षेत्रात कामे करीत असलेल्या इतरही व्यक्तींना आवाहन करून एक ई-चर्चामंडळ (महाजालाच्या माध्यमातून होणाऱ्या पत्रव्यवहाराद्वारे साद-प्रतिसाद देणाऱ्यांचे व्यासपीठ) स्थापन करावे व त्या मंडळातील चर्चेला 'भाषा आणि जीवन'मध्ये संपादित स्वरूपात स्थान निर्माण करून द्यावे असा विचार पुढे आला. ह्यातून अनेक गोष्टी साध्य होऊ शकतात. नवशब्दनिर्मितीला (Neologism) चालना मिळेल, भाषाप्रेमी व्यक्तींपैकी ज्यांचा पत्रव्यवहार ई-टपालाच्या माध्यमातून चालू असतो त्यांचे बौद्धिक भरणपोषण होत राहील, अधिकाधिक लोक चर्चेत सहभागी होऊन त्यांच्यामधील वैचारिक देवाणघेवाणींचा परीघ विस्तारत जाईल, परिणामी भाषिक संस्कृतीच्या संवर्धनास मोलाची मदत होईल. एवढेच नव्हे, तर त्या ई-पत्रव्यवहारातील संपादित अंश 'भाषा आणि जीवन'मध्ये एका नवीन सदराच्या माध्यमातून प्रसिद्ध केला तर महाजालाच्या कक्षेबाहेरील अभ्यासकांना व भाषाप्रेमींना ती चर्चा आपापल्या क्षेत्रात उपयुक्त ठरेलच, शिवाय सर्वसामान्य वाचकांनाही ती उद्‌बोधक व मनोरंजक वाटेल. यानिमित्ताने आधुनिक तंत्रज्ञानाचा फायदा घेऊन चर्चा गतिमान राहील व चर्चेतील ताजेपणा टिकेल; अशीही अपेक्षा आहे.

ह्या ई-चर्चामंडळात सर्वांचे स्वागत आहे. प्रथम आपले ई-पत्र e-shabdacharcha@gmail.com ह्या पत्त्यावर पाठवून आपला थोडक्यात परिचय (संपूर्ण नाव, स्थिरभाष व चलभाष क्रमांक, ई-पत्ता व आपल्या कार्यक्षेत्राची थोडक्यात माहिती, रुचीचे विषय इ०) देऊन मग चर्चेसाठी मुद्दा उपस्थित करावा वा चालू असलेल्या चर्चेसंबंधात आपले म्हणणे मांडून सहभागी व्हावे. पुढील पत्रापासून आपला सहभाग चर्चामंडळात सामील झालेल्या सर्वांपर्यंत पोहोचण्यासाठी ह्या उपक्रमात सहभागी झालेल्या प्रत्येकाने आपले ई-पत्र वरील पत्त्यावर पाठवून त्याच्या प्रती Cc नामक चौकटीतील Reply to all हा विकल्प निवडून मंडळात त्या टप्प्यापर्यंत सामील झालेल्या सर्व सदस्यांना पाठवाव्यात. असे केल्याने त्या सदस्यांपैकी ज्या कुणाला आपला प्रतिसाद

नोंदवायचा असेल त्याला तसे करणे शक्य होईल.

वाचकांनी ह्या उपक्रमाविषयीचा आपला अभिप्राय 'भाषा आणि जीवन'कडे पाठवावा. त्याचप्रमाणे ह्या सदरात प्रसिद्ध झालेल्या चर्चेच्या अनुरोधाने काही प्रतिसादात्मक टिपणी वा कसल्याही स्वरूपाची माहिती नोंदवायची असेल वा चर्चेसाठी नवीन मुद्दे उपस्थित करायचे असतील तर तेही ई - पत्राद्वारे किंवा संपादकांकडे पारंपरिक टपालाद्वारे पाठवावेत, अशी विनंती आहे.

संपादक

■

## एक : 'सॉम्निलोकंट'

भाषांतराचे काम करीत असताना मला somniloquent ह्या इंग्रजी शब्दासाठी मराठी प्रतिशब्द सुचेना. ह्या शब्दाचा सर्वसामान्य अर्थ, झोपेत बोलण्याची बोलत राहण्याची विकृती जडलेला रुग्ण असा आहे.

महाराष्ट्र शासनातर्फे प्रसिद्ध केल्या गेलेल्या 'विकृतिशास्त्र पारिभाषिक शब्दावली'मध्ये असा शब्द सापडतो व त्यासाठी मराठी प्रतिशब्द योजलेला आहे तो 'निद्राचर' असा. somnambulant साठी प्रतिशब्द आढळत नाही. लेडी मॅकबेथ सिंड्रोम ह्या नावाने एक विकृतीचा प्रकार ओळखला जातो व रुग्ण झोपेत चालतो व बोलतो, अशी दोन्ही लक्षणे ज्या रुग्णामध्ये आढळतात त्याला ह्या विकृतीने ग्रासलेले असते, असे वर्णन ज्ञानकोशांत आढळते.

Somnus हा लॅटीन शब्द असून त्याचा अर्थ झोप असा आहे आणि ambulare म्हणजे चालणे व loqui म्हणजे बोलणे.

वरील माहितीवरून somniloquent ह्या शब्दासाठी शक्य तितका अचूक व अर्थवाही मराठी प्रतिशब्द सुचवता येईल काय?

**- विजय पाध्ये**

झोपेत बडबडणे ह्यासाठी कोकणात 'जाबडणे' असा शब्द वापरतात. माझ्या आईच्या तोंडून मी हा शब्द अनेकदा ऐकला आहे.

'महाराष्ट्र-शब्दकोशा'त पुढीलप्रमाणे नोंद आहे. जाबडणे : (अक्रि.)१. (क.) झोपेत बोलणे २. (राजा) वेड्यासारखी बडबड करणे बरळणे जाबणे पाहा जाबणे : अक्रि. (गांवढळ) बरळणे बडबडणे तापात झोपेत) असंबद्ध भाषण करणे.

ह्यातील जाबड ह्या धातूवरून जाबडणारा असा कर्तृवाचक शब्द तयार करता येईल.

**- सुशान्त देवळेकर**

सुशान्त ह्यांनी सुचविलेला शब्द स्वतंत्र शब्द म्हणून ठीक वाटतो. परंतु Somnus म्हणजे निद्रेशी संबंधित शब्दांमध्ये (निदान पारिभाषिक संज्ञांमध्ये) निद्रा या पदिमाची उपस्थिती आवश्यक वाटते.

**- मिलिंद मालशे**

मी डॉ० मालशे ह्यांच्याशी सहमत आहे. इथे भाषांतराचा प्रकार भाषानुवाद असा आहे, भावानुवाद नव्हे. वैद्यक क्षेत्रातील मजकुराचे भाषांतर करताना मूळ शब्दातील प्रत्येक पदिम ध्यानात घेऊनच शब्दघडण करायला हवी. प्रचलित असलेल्या शब्दातून झोपेत बडबडण्याची क्रिया ही विकृतीचा एक प्रकार आहे असे सूचित होत नाही. शिवाय एका विशिष्ट भागात तो शब्द रूढ असला तरी त्याचे सार्वत्रिकीकरण झालेले असल्याशिवाय तो आपल्याला भाषांतराच्या कामात योजता येणार नाही. निद्रा हा शब्द सर्वतोमुखी झालेला आहे आणि चर हे निशाचर, जलचर, भूचर अशा सुपरिचित शब्दांमुळे निद्राचर हा प्रतिशब्द सहजगम्य ठरू शकतो व रूढही होऊ शकतो. तसा नवीन शब्द झोपेत बडबडण्याच्या विकृतीसाठी घडवायला हवा.

**- विजय पाध्ये**

नेमक्या पारिभाषिक शब्दाचीच गरज आहे असे नाही. बोलणे या शब्दामध्ये आणि व्यवहारामध्ये काहीएक सुसंगती गृहीत असते असे वाटते. बरळणे या शब्दामध्ये असंबद्धता गृहीत असते. सरळ झोपेतील बरळणे असे म्हणण्यास हरकत नसावी. मग गंगाधर पाटील यांच्या शैलीत आणि मिलिंद मालशे यांची क्षमा मागून निद्रागत असंबद्ध वाचिक व्यवहार किंवा निद्रागत वाचिक व्यवहार असे म्हणता येईल.

**- हरिश्चंद्र थोरात**

## दोन : 'काश्मीर'

माझा प्रश्न काश्मीर भूमीबाबत नसून काश्मीर ह्या शब्दाबाबतचा आहे. ज्ञानेश्वरीत काश्मीर शब्द दोन ओव्यांत आढळला :

''पैं काश्मीराचा रवा। कुंकुमावरी पांडवा।
आणिका गमे लोहिवा । तो तरी नव्हे ॥'' (१५.३४९) आणि
''हिमवंतीची सरोवरे। चंद्रोदयी होती काश्मीरे।
मग सूर्यागमी माघारे। द्रवत्व ये ॥'' (१८.१६१४)

ह्या ठिकाणी काश्मीर शब्दाचा अर्थ स्फटिक असा आहे. हा मूळ संस्कृत शब्द आहे का, हे पाहण्यासाठी ज०वि० ओकांचा 'गीर्वाणलघुकोश' उघडला. त्यात तो आढळला, पण त्याचे अर्थ १ केशर २ पुष्करमूळ स्थल कमलिनी, काळी द्राक्षी (स्त्री०) असे आहेत.



अनुक्रमणिका

स्थल कमलिनी म्हणजे (बहुधा) शिंगाडे ही वनस्पती असावी. हंस पक्षी ही वनस्पती खातात. ह्या वनस्पतीच्या देठात चीक असतो. लांबून तो दुधासारखा दिसतो. त्यामुळेच हंस पाण्यातून दूध वेगळे करून पितो असा समज दृढ झाला आणि त्यातूनच नीरक्षीरविवेक न्याय रूढ झाला.

असे असले तरी 'काश्मीर म्हणजे स्फटिक' असा अर्थ कोशात नाही. मग स्फटिक असा त्याचा मराठीत अर्थ कधीपासून रूढ झाला की ज्ञानेश्वरांनीच तो रूढ केला आणि सर्वात शेवटी काश्मीर हा प्रदेशवाचक शब्द केव्हापासून वापरात आला?

**- उमेश करंबेळकर**

ज्ञानेश्वरांसारखा विद्वान कुठेही काहीही आगापिछा नसताना आपलाच एक नवीन शब्द रूढ करणार नाही.

दाते-कर्वे यांच्या कोशात 'काश्मीर'चा एक अर्थ 'स्फटिक - शुद्ध संगमरवरी दगड' असा दिलेला आहे. उदाहरण म्हणून मग ''काश्मीराचे स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ।'' (ज्ञा० ६-२५३) हे उद्धधृत केलेले आहे.

**- सलील कुळकर्णी**

माझा मूळ प्रश्न 'काश्मीर' ह्या संस्कृत शब्दाचा स्फटिक असा अर्थ कोणत्या संस्कृत लेखनात आला; असा आहे.

तसेच काश्मीरा हा लोकरीचाही प्रकार आहे. ही लोकर काश्मीरमध्ये आढळणाऱ्या मेंढीच्या लोकरीपासून करतात का? काश्मीरी म्हणजे सरस्वती, हे अर्थ कसे आले? मुख्य म्हणजे काश्मीर हे प्रदेशवाचक नाव केव्हापासून रूढ झाले?

शेवटी ज्ञानेश्वरांसारखा अलौकिक प्रतिभेचा कवी आणि मऱ्हाठी भाषेचा प्रचंड अभिमानी स्वत:च्या प्रतिभेने नवीन शब्द करू शकणार नाही का?

**- उमेश करंबेळकर**

१. तुमची सुरुवातीची विचारणा होती, काश्मीर ह्या संस्कृत शब्दाचा स्फटिक असा अर्थ कोणत्या संस्कृत लेखनात आला आहे आणि स्फटिक असा त्याचा मराठीत अर्थ कधीपासून रूढ झाला की ज्ञानेश्वरांनीच तो रूढ केला? त्याला उत्तर देण्यासाठी मी मराठीमधील काश्मीर या शब्दाच्या स्फटिक या अर्थाविषयी लिहिले व तो ज्ञानेश्वरांनी तो शब्द स्वत:च्याच डोक्यातून काढून रूढ केलेला नाही, असे विधान केले.

२. त्यानंतरची तुमची विचारणा होती, की ज्ञानेश्वरांसारखा अलौकिक प्रतिभेचा कवी आणि मराठी भाषेचा प्रचंड अभिमानी स्वत:च्या प्रतिभेने नवीन शब्द करू शकणार नाही का? ह्या प्रश्नाला माझे उत्तर 'नाही' असे आहे. कवी प्रतिभावंत असला आणि भाषा प्रगल्भ असेल तर कुठलाही आगापिछा नसलेले अर्थाअर्थी काहीही साम्यछटा नसलेले व्युत्पत्तीच्या दृष्टीने काहीच संबंध नसलेले शब्द आपल्या डोक्यातून काढून रूढ

करण्याची आवश्यकता भासत नसते. काहीही कारण नसताना, 'चला ह्यापुढे स्फटिक ह्या अर्थाने काश्मीर हा शब्द वापरूया', असले प्रकार कोणीच प्रतिभावंत साहित्यिक करणार नाही.

तसे पाहता ज्ञानेश्वरांनी 'ज्ञानेश्वरी' लिहिताना अनेक नवीन शब्द उपयोगात आणले आहेत किंवा रूढ शब्दांची नवीन रूपे वापरली आहेत; पण ते शब्द आकाशातून पडलेले वाटत नाहीत. त्यांच्यामागे काही अर्थाचा विचार, व्युत्पत्ती, तर्कशुद्ध समर्थन असते. ह्याविषयी ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांनी अधिक भाष्य करावे.

अनेक प्रतिभावंत साहित्यिकांनी असे उत्तमोत्तम शब्द रूढ केले आहेत. ह्या अर्थासाठी यापुढे केवळ मला वाटते म्हणून 'क्ष असा शब्द वापरू या आणि त्या अर्थासाठी य असा शब्द योजूया', अशी बुद्धी प्रतिभावंतांची कधीही होत नाही. तसे केवळ स्वत:स प्रतिभावंत समजणारे पढतमूर्खच करू जाणे. केंद्र सरकारच्या पगारावर पोसलेल्या हिंदी पंडितांनी शोधून काढून रूढ केलेले 'व्यस्त' व यासारखे इतर अनेक अनावश्यक व विपर्यस्त शब्द पाहून ह्याची खात्री पटते. **- सलील कुळकर्णी**

'गीर्वाणलघुकोश' पुन्हा चाळताना कश्मीरज:(जं)=केशर असाही एक शब्द दिसला आणि 'काश्मीर प्रश्न सुटला'!

कश्मीरज: म्हणजे कश्मीर प्रदेशात जन्मणारे म्हणजेच आढळणारे ते कश्मीरज. यावरून कश्मीर हाही गांधार (आत्ताचे कंदाहार) बव्हेरू (आत्ताचा बहारीन) यासारखाच एक प्रदेश होता. कश्मीर हे प्रदेशाचे नाव होते.

अनेकदा एखाद्या विशिष्ट प्रदेशातच आढळणाऱ्या वस्तू, वनस्पती, पशु-पक्षी इत्यादींना त्या त्या प्रदेशावरून नावे पडलेली आढळतात. अशा प्रकारच्या पशुपक्षी वनस्पतींना स्थलमर्यादित (इंग्रजीत endemic असं म्हणतात. उदाहरण द्यायचे झाले तर वायतुरा ही वनस्पती फक्त सातारा जिह्यातच (कासजवळ) आढळते. म्हणून तिचे शास्त्रीय नाव आहे Aponogenton Satarensis असं आहे. तसेच पाचगणीत आढळणाऱ्या एक प्रकारच्या आमरी वनस्पतीचं नाव Habenaria Pachganensis असं आहे.

अशा प्रकारे कश्मीर प्रदेशाशी संबंधित वस्तूंना वनस्पतींना काश्मीर हे नाव पडले असावे. आता एकेक उदाहरणे घेऊ. काश्मीर - केशर. केशर ही वनस्पती काश्मीर मध्येच मोठ्या प्रमाणात आढळते.

काश्मीर - स्थलकमलिनी. ही एक प्रकारची कमल वर्गातील पाणवनस्पती काश्मीरातील सरोवरांत आढळते. (शिंगाडे हे अशा वनस्पतींचे सुकवलेले कंद असतात.)

काश्मीरी = सरस्वती. सरस्वती देवीचे सर्वांत पुरातन मंदिर काश्मीरातच आहे. (दुसरे गोदावरीच्या काठी).





अनुक्रमणिका

काश्मीरी = लोकरीचे वस्त्र. शाल. ही शालही काश्मीरात आढळणाऱ्या मेंढ्यांच्या लोकरीपासून केलेली असते.

काश्मीर = स्फटिक. अस्सल स्फटिक हिमालयात उगम पावणाऱ्या आणि काश्मीरातून वाहणाऱ्या नद्यांच्या काठी आढळतात. (जसे नर्मदेचे गोटे प्रसिद्ध तसे काश्मीरातील स्फटिक.)

असे हे सर्व अर्थ कश्मीर ह्या प्रदेशाच्या नावावरून त्यांना प्राप्त झालेले आहेत.

पूर्वीच्या काळीही आजच्या सारखे भटके व्यापारी असत आणि ते दूर दूर देशांत वेगवेगळ्या प्रदेशातील खास वस्तू विकत असत. स्फटिकाचा काश्मीर हा शब्द त्यांच्याकडूनच महाराष्ट्रात आला असावा. त्यामुळे संस्कृत साहित्यात स्फटिक या अर्थाने काश्मीर हा शब्द आढळला नाही तरी त्या काळात तो मराठीत प्रचलित असावा, असे मला वाटते.

ह्या माहितीसाठी मदत करणारे डॉ० दत्तप्रसाद दाभोळकर आणि प्रा० बसवराज कोरी ह्यांना धन्यवाद.

**- उमेश करंबेळकर**

आपणहून चक्रव्यूहात शिरायचे, मग इतरांना त्यात गोवायचे आणि शिताफीने त्यातून बाहेर पडायचे हा खेळ अगदी रमणीय झाला डॉक्टर, असो. त्यानिमित्ताने आणखी एका शब्दशोधाला वाट फुटली. तो शब्द म्हणजे 'स्थलकमलिनी'. ह्या शब्दातच कमल ह्या फूलविशेष वनस्पतीचा संदर्भ प्रतीत होतो. गुगलहून जेव्हा ह्या वनस्पतीविषयीची माहिती काढली तेव्हा ह्या शब्दाची नाळ बहुतेक भारतीय भाषांमध्ये कमल ह्या संस्कृतनिष्ठ शब्दाशीच निगडित असलेली दिसली. हे पाहा विविध भाषांमधील शब्द :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **असमीया** | - স্থল-পদ্ম | salapadma | | |
| **बांगला** | - স্থলপদ্ম | salapadma | | |
| **हिंदी** | - बाला | bala | दृष्टिकृत | drishtikrita |
| | देवा | dewa | पद्मा | padma |
| | पद्मचारिणि | padmacharini | प्रपौण्डरीक | prapaundarik |
| | पुण्डरीयक | pundariyak | साधुपुष्प | sadhu-pushp |
| | सालपुष्प | sal-pushp | स्थलकमल | sthal-kamal |
| | स्थलकमलिनी | sthal-kamalini | तरणी | tarani |
| **कन्नड** | - ಚಂದ್ರಕಾಂತಿ ಗಿಡ | chandrakanti gida | | |
| | ನೆಲತಾವರೆ | nelatavare | | |
| | ಸೂರ್ಯಕಾಂತಿ | suryakanti | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| काश्मिरी | - | न्योवु | nyovu, | स्थलपद्मम् | sthalapadmam |
| कोंकणी | - | सूर्यकांती | suryakanti | | |
| मलयालम् | - | chinappratti | | | |
| मराठी | - | कापूरभेंडी | kapurbhendi | | |
| नेपाली | - | पद्मा | padma | | |
| ओडिशा | - | tholopodmo | | | |
| पंजाबी | - | ਸ਼ਾਲਾਪਾਪਰਾ | shalapara | | |
| संस्कृत | - | अतिचरा | atichara | अव्यथा | avyatha |
| | | बाला | bala | दृष्टिकृत | drishtikrita |
| | | देवा | dewa | पद्मचारिणी | padmacharini |
| | | प्रपौण्डरीक | pra-paundarik | पुण्डरीयक | pundariyak |
| | | पुष्करमूलम | pushkarmulam | पुष्करनाडी | pushkarnadi |
| | | पुष्करपर्णिका | pushkarparnika | साधुपुष्प | sadhu-pushp |
| | | सालपुष्प | salapushpa | स्थलकमल | sthalakamala |
| | | स्थलकमलिनी | sthal-kamalini | स्थलपद्मम् | sthal-padamum |
| | | स्थलनलिनी | sthalanalini | स्थलपद्मिनी | sthalapadmini |
| | | स्थलारविन्द | sthalaravinda | स्थलेजात | sthalejata |
| | | स्थलोत्पलिनी | sthalotpalini | सुगंधमूलः | sugandhamula |
| | | तरणी? | | तर्पिनी | tarpini |
| तमीळ | - | மாலகம | malakam | | |
| तेलुगु | - | ముడుగుతామర | mudugutamara | | |
| | | నేత్తమ్మి | nettammi | | |
| | | స్థలపద్మము | sthalapdmamu | | |
| उर्दू | - | گل عجائب | gul-e-ajaib | | |

गमतीचा भाग असा दिसतो की काही भाषांप्रमाणे स्थलकमलिनी ह्या संस्कृत नामासाठी मराठी प्रतिशब्द दिलेला आढळला आहे, तो म्हणजे कापूरभेंडी! कमलपुष्पाशी फटकून वागणारा प्रतिशब्द! परंतु कापूरभेंडीचा आणि शिंगाड्यांचा काय संबंध असावा, ते समजत नाही.

शिंगाडे हे अशा वनस्पतींचे सुकवलेले कंद असतात, असे जे विधान उमेश करंबेळकर ह्यांनी चर्चेच्या सुरुवातीस केले आहे त्यासंदर्भात दै० 'दिव्य मराठी'च्या १५ नोव्हेंबर २०११च्या अंकात प्रसिद्ध झालेली माहिती अशी आहे - उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश आणि बिहारमध्ये शिंगाडे मोठ्या प्रमाणावर होतात. काश्मीर हा पाण्याचा प्रदेश असल्याने तेथील तलावात उत्तम प्रकारचे शिंगाडे येतात. पश्चिम बंगालमध्ये शिंगाड्याची पैदास कमी होते. परंतु तेथे त्याचे खाद्यमूल्य अत्यंत उच्च समजले जाते. गुजरात उष्ण कटिबंधात असल्याने येथे शिंगाड्याचे उत्पन्न जास्त होते.

महाराष्ट्र शासनातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'महान्यूज'मधल्या माहितीवरून मात्र असे दिसते की शिंगाड्याची लागवड केल्यानंतर त्याची वेल तयार होते. ती वेल प्रथम कमी पाण्यात लावावी लागते. त्यानंतर वाढ झाल्यावर जास्त खोलीच्या पाण्यात लावण्यात येते. शिंगाड्याची लागवड करण्याची पद्धत अतिशय कठीण आणि मेहनतीची असली तरी हमखास पैसे मिळवून देणारे हे पीक आहे.

ह्या वनस्पतीमधून दुधासारखा पांढरा असलेला जो चीक हंस पक्षी शोधून घेतो, त्यावरून हंसाचा नीरक्षीरविवेक हा न्याय सिद्ध झाला ही माहिती खरोखरच मनोरंजक व ज्ञानवर्धक आहे. आभार!

**- विजय पाध्ये**

## चर्चेत सहभागी मंडळींचा अल्प परिचय

**करंबेळकर,** (डॉ०) उमेश : सातारा येथे वैद्यकीय सेवेत तसेच निसर्ग व विशेषकरून पक्षिविज्ञानाच्या क्षेत्रात कार्यरत.(ई-पत्ता umeshkarambelkar@yahoo.com)

**कुळकर्णी,** सलील : संगणकशास्त्र व सॉफ्टवेअर क्षेत्रात कार्यरत मराठी व संस्कृत भाषेचे अभ्यासक. (ई-पत्ता saleelk@gmail.com)

**थोरात,** (डॉ०) हरिश्चंद्र : निवृत्त प्राध्यापक, टागोर अध्यासन, मुंबई विद्यापीठ. (ई-पत्ता hgthorat@gmail.com)

**देवळेकर,** सुशान्त : राज्य मराठी विकास संस्था, मुंबई येथे कनिष्ठ संशोधक-साहाय्यक म्हणून कार्यरत. (ई-पत्ता sushant.devlekar@gmail.com)

**पाध्ये,** विजय : व्यावसायिक भाषांतरकर्मी, 'भाषा आणि जीवन'च्या संपादन-समितीचे सदस्य. (ई-पत्ता v.wordsmith@gmail.com)

**मालशे,** (डॉ०) मिलिंद : आयआयटी, पवई (मुंबई) येथे इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून कार्यरत भाषाविज्ञान व सौंदर्यशास्त्र विषयांचे अध्यापक, अभिजात भारतीय संगीताचे अभ्यासक व गायक. (ई-पत्ता milindmalshe@yahoo.com )

■





अनुक्रमणिका

# वचनवेध : दोन शब्द

पंडित आवळीकर/विजया तेलंग

## (१) 'अंदण'

'अंदण' किंवा 'आंदण' या शब्दाचे मराठीतील अर्थ असे आहेत :

(क) ''कन्येच्या विवाहाचे वेळी तिला किंवा जावयाला दिलेली देणगी : करणी''[१]

(ख) ''Presents (of land, animals, slaves, etc.) additional to the customary and necessary presents (of money, trinkets, and articles of apparel) made at marriages by the father of the bride to his daughter or to his son-in-law.''[२]

'अंदण देणे' हा वाक्प्रचार एखाद्याला एखादी गोष्ट कायमची बहाल करणे या अर्थाने आज रूढ आहे. असे असले, तरी या शब्दाचा किंवा वाक्प्रचाराचा आढळ प्राचीन वाङ्मयात होत नाही. स्वयंवर-काव्यात तरी तो मिळावयास हवा. यादवकालातील मराठीत न मिळणारा हा शब्द बसवण्णांच्या एका वचनात भेटतो. 'अंदणवनेरिद सोणगनंते'[३] 'अंदण' म्हणजे 'पल्लक्कि' = पालखी. 'पालखीत बसवलेल्या कुत्र्याप्रमाणे' असा या पंक्तीचा अर्थ आहे. 'अंदण' शब्दाचा 'पालखी' हा हळेगन्नडमधील अर्थ आणि मराठीतील या शब्दाचा उगम आणि अर्थ पाहिले असता विवाहविधीत मुलीला/जावयाला 'पालखी' दिली जात असे, ही प्रथा सूचित होते. कन्नड भाषेच्या उत्तरकालात कुमारव्यासांनी हा शब्द आपल्या 'उद्योगपर्वा'त 'पल्लक्कि' याच अर्थाने वापरलेला आहे.[४] महानुभाव वाङ्मयात 'पालखी' या अर्थाचा 'दांडी' हा शब्द येतो.[५] पण 'अंदण' हा शब्द येत नाही.

## (२) अवसर

'अवसर' हा शब्द संस्कृत खरा आणि त्याचे 'प्रसंग, वेळ, संधी' असे अर्थ वा०शि० आपटे,[५] 'वा० गो० आपटे'[६] इत्यादींनी दिले असले[७] तरी किटेलने दिलेला haste from necessity, urgency, speed, hurry [८] हा अर्थ बसवण्णांच्या काळापासून आजही कन्नडमध्ये प्रचलित आहे. बसवण्णांच्या वचनात आलेल्या या शब्दाचा अर्थ 'प्रसंग' असा मानला गेला, तरी तोही पुन्हा तपासण्यासारखा आहे. 'पूजावसर' या महानुभावांच्या ग्रंथनामातील 'अवसर' म्हणजे (पूजेचा) प्रसंग. पण या प्रसंगात असणारी घाई, त्वरा, गती - एक प्रकारची 'तारांबळ' - ही 'अवसर' शब्दाची

उपर्युक्त कन्नड छटा ध्यानी घेतली, तर जाणवू शकेल. पुन्हा हळेगन्नडमध्ये 'प्रसंग'ची आणखी एक अर्थच्छटा आहे. प्रभुदेवांच्या वचनात 'प्रसंग' हा शब्द 'संभाषण, चर्चा, गोष्टी' या अर्थाने येतो. म्हणजे 'प्रसंगी अखंडित वाचीत जावे' या रामदास-वचनाचा वेगळा धांडोळा आलाच!

मराठी-कन्नडमधील समान शब्दांच्या भिन्नभिन्न अर्थच्छटा एकमेकांवर, त्यांच्यातून सूचित होणाऱ्या जीवनव्यवहारावर कसा प्रकाश टाकू शकतात, हे पाहणे अगत्याचे आहे. नव्हे फलप्रद ठरणारे आहे.

**संदर्भ :**


( १ ) मराठी शब्दरत्नाकर, (सं) वा०गो० आपटे, पृ० १४.

( २ ) मोल्सवर्थकृत मराठी-इंग्रजी शब्दकोश पृ० २२.

( ३ ) बसवण्णावर वचनगळु, संपादक आर०सी० हिरेमठ, कर्नाटक विश्वविद्यालय प्रकाशन, १९६८, वचन ३४.

( ४ ) कुमारव्यास भारत, उद्योगपर्व, ९-३०.

( ५ ) लीळाचरित्र, पूर्वार्ध ३०, ४८, ७४, ११६; उत्तरार्ध ६५, १९९, २३२, ६४०.

( ६ ) Sanskrit-English Dictionary, p. 62

( ७ ) मराठी शब्दरत्नाकर, पृ० ३०.

( ८ ) A Kannada-English Dictionary, p. 121 ■



['भाषा आणि जीवन', वर्ष ७ अं० १, हिवाळा १९८९, पृ० १९-२१ मधील लेखाचा संपादित भाग ]


**वाचावे असे काही**

(१) कातकरी समाज व कातकरी बोली भाषा, नानासाहेब शामराव यादव, 'नवअनुष्टुभ', जानेवारी-फेब्रुवारी २०१२, पृ० २८-३१.

(२) मराठी अभिजात कशी ?, हरी नरके, 'लोकराज्य', जानेवारी-फेब्रुवारी २०१२, पृ० ८१-८३.

(३) संरचनावादपूर्व कथामीमांसा : रशियन रूपवाद - हरिश्चंद्र थोरात, 'मुक्त शब्द', एप्रिल २०१२, पृ० ६०-६४.

(४) 'हिंदू'तील लेवा गणबोली, श०रा० राणे, 'लोकप्रभा', २० एप्रिल २०१२, पृ० ६२-६५.

# 'मराठी शब्दरत्नाकर'ची प्रस्तावना

वा०गो० आपटे

'अहंच भाष्यकारश्च कुशाग्रीयधियावुभौ ।
नैतौ शब्दांबुधेः पारं किमन्ये जडबुद्धयः ॥'

अर्थ : मी व भाष्यकार दोघेही कुशाग्रबुद्धीचे असता आम्हांलाही शब्दसमुद्राचे पैलतीर गाठता आले नाही, मग जडबुद्धीच्या इतर माणसांची काय कथा?

ही उक्ती कोणाची आहे ते ठाऊक नाही; पण कोणाचीही असली तरी ती अर्थपूर्ण व अनुभवसिद्ध आहे यांत काही शंका नाही. शब्द हे गतकालीन व विद्यमान व्यक्तींच्या अमूर्त विचारांच्या दृश्यमान मूर्ती होत. अर्थात स्थलकालादिकांनी त्यांचे स्वरूप मर्यादित केलेले असावयाचे, हे अगदी उघड आहे. तसेच स्थल व काल या दोन्ही गोष्टी वारंवार पालटणाऱ्या असल्यामुळे व त्यांचा परिणाम मनुष्याच्या विचारांवर होत असल्यामुळे त्या विचारांच्या दृश्य मूर्ती जे शब्द त्यांच्यांतही वरचेवर पालट होत असतो; काही जुने शब्द लुप्त होतात किंवा विकार पावतात, व काही अगदी नवे शब्द माणसांच्या प्रचारात येतात. एकंदर मनुष्यांच्या भाषेत अशी घडामोड सारखी चाललेली आहे व पुढेही चालत राहणार. सर्वसामान्य मानवी भाषेसंबंधाने हे विधान जितके खरे आहे, त्यापेक्षाही मर्यादित स्वरूपाच्या म्हणजे विशिष्ट देशापुरत्या किंवा प्रांतापुरत्या बोलण्या-चालण्यात असलेल्या भाषांसंबंधाने ते अधिक खरे आहे. कारण, सर्वसामान्य मानवी भाषेत फरक होण्याला विचारक्रांती येवढेच एक कारण असते, परंतु अधिक मर्यादित अशा देशीय किंवा प्रांतिक भाषांत उलथापालथ होण्याला राजकीय घडामोडी, सामाजिक उत्क्रांती किंवा अधोगती, व्यापारादी निमित्तांनी परकीयांशी घडणारा संसर्ग इ० अनेक बाह्य उपाधी कारणे होत असतात, आणि म्हणून प्रत्येक भाषेचा शब्दसंग्रह शतकाशतकाने किंवा कमी अधिक कालमानाने रूपांतर पावत जात असतो. म्हणून पूर्वकालीन व विद्यमान काळच्या विचारांविषयीच्या जिज्ञासू माणसाला आपापल्या भाषेच्या अव्वल काळापासून तो विद्यमान कालापर्यंतच्या शब्दांच्या संग्रहाची आवश्यकता भासू लागते, आणि त्यामुळेच असे शब्दकोश हरएक प्रौढ भाषेत निर्माण होत असतात.

हे शब्दकोश म्हणजे गतकालीन व विद्यमान व्यक्तींच्या विचारांची तिजोरी असते. येवढेच नाही, तर भावी पिढ्यांतील लोकांच्या विचारबुद्धीची ती एक प्रकारची तयारीही असते असे म्हणता येईल. मनुष्याच्या विचाररूपी शिडीचे अगदी वरचे अग्र जरी दिसले

नाही, तरी वरच्या एक दोन पायऱ्या खास दिसत असतात व जसजसा तो वर वर जाऊ लागतो तसतशा त्या त्याला अधिकाधिक स्पष्ट दिसू लागतात. खालून चढून आलेल्या पायऱ्यांच्या भक्कम आधारावरच तो पुढच्या पायऱ्या आक्रमण्याची हिंमत बांधीत असतो. सारांश, पूर्वीच्या विचारांच्या व त्यांच्या दृश्य मूर्ती म्हणजे भाषेतले शब्द यांच्या भरभक्कम शिदोरीवर सगळे लेखक, वक्ते, धर्मोपदेशक वगैरे लोकांची व्यवहारयात्रा चालते व त्यांचे मार्गक्रमण सुकर होते. म्हणून या लोकांनी आपल्या अगोदरच्या काळात होऊन गेलेल्या लोकांचे सदैव ऋणी असले पाहिजे.

मराठी लेखकांपुरताच विचार केला तर गेल्या शंभर वर्षांतले आमचे मराठी लेखक आपल्यावरचे मायभाषेचे हे ऋण पूर्णपणे स्मरून वागले नाहीत असे मोठ्या दु:खाने म्हणावे लागते. इंग्रजी विद्येच्या नादी लागून त्यांनी आपल्या वडिलांनी ठेविलेल्या विचारसंपत्तीचा व शब्दसंपत्तीचा अनादर केला. त्यामुळे पूर्वीच्या विचारपरंपरेस ते पारखे झाले, आणि शिडीवर चढणारा माणूस प्रखर सूर्यप्रकाशाने डोळे दिपून गेल्यामुळे घाबरून जातो व पुढची पायरी चढण्याचे त्याचे अवसान सुटते, तशी आमच्या लोकांची सध्या स्थिती झाली आहे. अशा वेळी थोडा वेळ तरी वर सूर्य-प्रकाशाकडे न पाहता खालच्या पायऱ्यांकडे जर आपण पाहू किंवा असलेल्या ठिकाणीच पण पाय लटपटू न देता डोळे मिटून स्वस्थपणाने उभे राहू, तर थोड्याच वेळात आपल्या डोळ्यांपुढे दिसणारे काजवे नाहीसे होऊन आपणांस आपला पुढचा मार्ग स्पष्ट दिसू लागेल. याचसाठी जुन्या संस्कृत व मराठी वाङ्मयाचे अध्ययन हल्लीच्या काळी अवश्य आहे व त्यांची साधने उपलब्ध करून घेता येतील तेवढी घेणे हे आपले एक अवश्य कर्तव्य आहे. कोश हे एक असे साधन आहे.

दुसऱ्याही एक प्रकारे मराठी कोशाची आज अत्यंत आवश्यकता आहे. गेल्या शंभर वर्षांत मराठी साहित्याची वाढ निरनिराळ्या अंगांनी करण्याचे प्रयत्न चालले आहेत. काव्ये, नाटके, इतिहास व चरित्रे, तत्त्वज्ञान, भाषा, अलंकार, व्याकरण, भौतिकशास्त्रे इ० विषयांवर नवीनवी ग्रंथरचना झाली आहे व होत आहे. ती करताना पुष्कळ वेळा आपले विचार यथार्थरीत्या व्यक्त करण्याच्या कामी समर्पक शब्द शोधून काढण्याची यातायात लेखकांना कमीजास्त मानाने करावी लागली आहे यात शंका नाही. मराठी भाषेचा आजतागायत संपूर्ण कोश उपलब्ध असता तर आपणांस हवा आहे त्या अर्थाचा एखादा शब्द आपल्या भाषेत अगोदरचा आहे की नाही हे त्यांना पाहता आले असते व असल्यास त्या जुन्या शब्दाचाच उपयोग करून त्यांनी त्या शब्दाला चिरायू केले असते. पण दुर्दैवाने तसा कोश नसल्यामुळे लेखकांना नवे शब्द बनविण्याची दगदग निष्कारण झाली, व जुने चांगले शब्द लुप्त होऊन मराठी भाषेत नव्या शब्दांना धुडगूस घालण्यास संधी मिळाली.

आतापर्यंत मराठीत मुळीच शब्दकोश झाले नाहीत असे म्हणण्याचे धाडस कोणाला करता यावयाचे नाही. आतापर्यंत काही नाही तरी लहान मोठे १८ शब्दकोश मराठीत झाले आहेत. रा० राजवाडे यांनी एके ठिकाणी त्यांच्या माहितीतल्या कित्येक कोशांचा परिचय मराठी वाचकांस यापूर्वी करून दिलाच आहे.

आपल्या मराठी भाषेचा आदर्शकोश कोणी करावयाचा झाला तर माझ्या मते तो असा व्हावयास पाहिजे-

(१) आदर्श कोशांत व्यवहाराच्या भिन्नभिन्न शाखांतले झाडून सारे मराठी शब्द तर यावेच, पण या शिवाय जुने वाङ्मय, ताम्रपट, शिलालेख यांच्यातले अप्रसिद्ध शब्द, ऐतिहासिक कागदपत्रे, बखरी, सनदा, निवाडपत्रे वगैरेतले शब्द व त्याचप्रमाणे नवे जुने सर्व पारिभाषिक शब्दही अंतर्भूत व्हावे.

(२) जुन्या शब्दांच्या स्वरूपात नवीन लेखनपद्धतीप्रमाणे फिरवाफिरव न करता ते शब्द मूळच्या स्वरूपातच ठेवावे.

(३) शक्य तितक्या शब्दांची सर्वमान्य झालेली व्युत्पत्ती कोशात यावी. वादग्रस्त असलेली व्युत्पत्ती कोशाच्या परिशिष्टात द्यावी. परक्या भाषेतून आलेल्या शब्दांचे त्या त्या भाषेत मूळ रूप कोणते होते, तेही सर्वांना कळण्यासाठी बालबोध लिपीत द्यावे.

(४) व्युत्पत्तीच्या पुढे त्या शब्दाचे व्याकरण म्हणजे शब्दाची जात व लिंग ही द्यावी.

(५) त्या पुढे शब्दाचे अर्थ पुढील क्रमाने द्यावे - १. व्युत्पत्त्यर्थ; २. व्याख्या किंवा विस्तृत रूढ अर्थ; ३. पर्याय शब्द; ४. लाक्षणिक, अलंकारिक व व्यंग्यार्थ; ५. शब्दासंबंधाची पौराणिक, ऐतिहासिक व अवांतर माहिती; ६. संप्रदाय व म्हणी; ७. सामासिक शब्द; ८. तत्सदृश किंवा विरोधी शब्द (अर्थाच्या कमीजास्त छायांसह)

कोशात प्रादेशिक म्हणजे विशिष्ट प्रांतांतच रूढ असलेले शब्द द्यावे की न द्यावे या संबंधाने मतभेद होण्याचा संभव आहे. कित्येक चांगल्या उत्कृष्ट इंग्रजी कोशांतून प्रादेशिक इंग्रजी शब्द दिलेले नाहीत; कित्येकांत आहेत. माझी स्वत:ची अशी समजूत आहे की, शक्य असेल तर निदान ठळक तरी प्रादेशिक शब्द अवश्य द्यावेत. मोलस्वर्थच्या कोशांत असे काही शब्द दिले आहेत. मीही या कोशासाठी गोमांतक, कोंकण, सावंतवाडी, नागपूर, वऱ्हाड, कारवार, मालवण, खानदेश, माळवा, कोल्हापूर इ० प्रांतांतले ठळक प्रादेशिक शब्द मुद्दाम आणवून घातले आहेत. स्थलसंकोचामुळे या सगळ्या शब्दांना जोडून प्रांताचे नाव देता आले नाही. तथापि काही शब्दांचे प्रांत स्पष्टपणे निर्दिष्ट केलेले आढळतील. प्रस्तुत कोशात अनेक व्यंगे आहेत. ती माझी मला दिसत आहेत. काही संख्यावाचक शब्द, औषधे, वनस्पती, प्राणी, खाद्य पदार्थ इ०ची वर्णने मला स्थलसंकोचास्तव देता आली नाहीत. व्युत्पत्तीकडेही मला विशेषसे लक्ष देता आले नाही.

जुन्या प्राकृत शब्दांचे निरनिराळे अर्थ देताना ज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, गीतार्णव इ० ग्रंथांतली अवतरणे देण्याच्या ऐवजी त्यांच्या नुसत्या स्थलनिर्देशावरच मी काम भागवून नेले आहे. घोडा, कुत्रा, इ० सामान्य व सोप्या मराठी शब्दांचे अर्थ त्याहून सोप्या व आबालवृद्धांस परिचित अशा शब्दांनी न देता आल्यामुळे मूळ शब्दांचे संस्कृत पर्याय देण्यावाचून गत्यंतर नव्हते. सुमारे पाच सहा हजार प्रचलित शब्दांचे अर्थ कोठेही लिहिलेले आयते न मिळाल्यामुळे मला ते नव्यानेच यथामती जुळवून घालावे लागले आहेत. ऐतिहासिक कागदपत्रांतून अरबी, फारशी, उर्दू व इंग्रजी शब्दांचे हातपाय मोडून इतके विचित्र अपभ्रंश केलेले आढळले की, मूळचे शब्द कोणते असावेत हे त्या त्या भाषेच्या अभिज्ञांससुद्धा ओळखण्यास महत्प्रयास पडले, व तासचे तास खटपट करूनही शेवटी कित्येक शब्द ओळखता आले नाहीत, व त्यांचा अर्थही लागला नाही. काही तरी अंदाजाने अर्थ देण्यापेक्षा असे शब्द गाळून टाकणेच मला योग्य दिसले म्हणून ते शब्द दिले नाहीत. सारांश, माझ्या या कोशात सर्व प्रकारची व्यंगे राहिली आहेत हे माझे मनच मला सांगते आहे. पण माझ्या सारख्या रुग्ण, अल्पज्ञ व निर्धन माणसाला जेवढे काही करणे शक्य होते तेवढे करून मी हा कोश - नव्हे कोशाचा कच्चा खर्डा - विद्वानांच्या पुढे मांडला आहे. त्यांनी त्यातल्या हव्या तेवढ्या चुका काढून मला कळवाव्या, व व्यंगे दाखवून ती भरून काढण्याचे उपायही कृपा करून सुचवावे म्हणजे पुढच्या आवृत्तीच्या वेळी मला फार उपयोग होईल. कारण, हा दुसऱ्या आवृत्तीचा सुयोग लवकरच येईल, असा रंग दिसत आहे. ■

['मराठी शब्दरत्नाकर', वा०गो० आपटे, प्रका० गो० ब० जोशी, व्यवस्थापक आनंद कार्यालय, पुणे, १९२०च्या प्रस्तावनेतील संपादित भाग ]

### आयत्या पिठावर(?) रेघा

वि०का० राजवाडे ह्यांनी 'आयत्या पिठावर रेघा' ह्या म्हणीविषयी एक टिपणी केली होती ती अशी :

'अतिथे पीठेः रेषा' - माध्यान्हसमयी अतिथीची मार्गप्रतीक्षा यजमान करीत बसे. त्यावेळी आगंतुक अतिथीसाठी पाट किंवा पीठ मांडून त्यावर रेघा मारून ठेवीत. ते रेषाचिन्ह अतिथीची जागा सूचित करत असे. अतिथीने केवळ येऊन बसणे व जेवण करणे एवढेच काम! म्हणजे काहीही श्रम न करता खाण्याचे. त्यावरून 'आयत्या पिठावर रेघा' ही म्हण प्रचारात आली. पीठ म्हणजे धान्याचे पीठ नव्हे, तर आसन. त्यामुळे वास्तविक 'आयत्या पीठावर रेघा' असे म्हणायला हवे.

# वर्धापनदिन समारंभ

रंजना फडके

१ मे २०१२ रोजी मराठी अभ्यास परिषदेचा वर्धापनदिन व महाराष्ट्र दिन यांचे औचित्य साधून परिषदेतर्फे 'मराठी ही अभिजात भाषा आहे काय?' ह्या विषयावर परिसंवादाचे आयोजन करण्यात आले होते. प्रा० प्र०ना० परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या परिसंवादात डॉ० ब्रह्मानंद देशपांडे, डॉ० कल्याण काळे आणि प्रा० हरी नरके सहभागी झाले होते.

प्रा० परांजपे यांनी ''आपण मराठी भाषकांनीही डोळस आणि सजग असले पाहिजे. त्यासाठी केवळ शासनावर अवलंबून राहून चालणार नाही. मराठी भाषेच्या जाणकार अभ्यासकांनी आपल्या परीने प्रयत्न करून मराठी भाषेचे अभिजातपण आनंदाने मान्य करून ती आधुनिकही बनवली पाहिजे,'' असे मत प्रास्ताविकात व्यक्त केले.

मराठी भाषा सल्लागार समितीचे सदस्य आणि व्यासंगी अभ्यासक प्रा० हरी नरके यांनी सर्वप्रथम सध्या चर्चेत असलेल्या व जनमानसातील जिव्हाळ्याच्या विषयावर चर्चा घडवून आणल्याबद्दल परिषदेचे अभिनंदन केले. त्यानंतर त्यांनी मराठी भाषेच्या सद्य:स्थितीवर भाष्य केले. भाषा अभिजात ठरविण्याबाबत असणारे केंद्र सरकारचे निकष सांगताना भाषा कितीही प्राचीन असली तरी आजच्या भाषेत व तिच्यात अनुबंध असला पाहिजे, यावर त्यांनी भर दिला. या अनुषंगाने 'गाथा सप्तशती'पासून भालचंद्र नेमाडे यांच्या 'हिंदू'पर्यंतची आपली मराठी भाषा संपन्न आणि अभिजात आहे,'' असे त्यांनी ठामपणे सांगितले.

प्राचीन भारतीय इतिहासाचे अभ्यासक डॉ० देशपांडे यांनी ''प्राचीन शिलालेखांचा अधिक तपशिलाने अभ्यास व्हायला हवा, अशी अपेक्षा व्यक्त केली. कोणतीही अभिजात भाषा मानवी मनाला मोह घालते, लोकमानसात रुजते; हे दोन्ही गुण मराठी भाषेमध्ये आहेत'' असे सांगून त्या संदर्भात अनेक पुरावे देऊन 'मराठी भाषा अभिजातच आहे.' असे मत त्यांनी प्रतिपादन केले.

संत साहित्याचे अभ्यासक आणि मराठी भाषा सल्लागार समितीचे सदस्य डॉ० काळे यांनी 'ज्ञानेश्वरी', 'लीळाचरित्र', असा प्राचीन असणारा मराठी भाषेचा संपन्न वारसा सांगितला. तसेच राजारामशास्त्री भागवत, श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या लेखातील संदर्भ पुराव्यादाखल दिले. ते पुढे म्हणाले, ''अभिजात असल्यामुळेच मराठी भाषेचा इतर

प्रांतांत प्राचीन काळीही प्रसार झाला. मराठी भाषा, अभिजात आहे का? हा प्रश्न उपस्थित करणेच चूक आहे.''

परिसंवादाचा समारोप करताना अध्यक्ष प्रा० परांजपे यांनी ''अधिकाधिक लोकांपर्यंत हा विषय पोहोचला पाहिजे, या उद्‌बोधक हेतूने ही चर्चा आयोजित केली गेली'' असे सांगितले. या परिसंवादाचे अभ्यासपूर्ण आणि नेटके सूत्रसंचालन डॉ० नीलिमा गुंडी यांनी केले. कार्यक्रमात भाषेच्या जाणकार अभ्यासकांची उपस्थिती लक्षणीय होती, हे या कार्यक्रमाचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

■

## आजीव सदस्य (वर्ष २०११-१२)

(१) प्रा० सोनाली देशपांडे-गुजर, मुलुंड, मुंबई

(२) संपदा सुबोध जोशी, गिरगाव, मुंबई

(३) डॉ० वनिता ठाकुर, वडोदरा

(४) प्रा० (डॉ०) माधुरी वि० दाणी, फलटण, जि० सातारा

(५) प्रा० शिवाजी एंडाईत, चाकण, पुणे

(६) शरद दादासाहेब पवार, मु०पो० सावर्डे, ता० तासगांव, जि० सांगली

(७) डॉ० माधव कृ० दातार, सांताक्रूझ (प०), मुंबई

(८) प्रा० सुवर्णा अभय गादे, अमरावती

(९) डॉ० प्रसाद जोशी, पुणे

(१०) प्रा० नवनाथ अंगद शिंदे, कोल्हार (बु), ता० राहाता, जि० अहमदनगर

(११) प्रा० सुजाता शेणई, सिंहगड रोड, पुणे

(१२) डॉ० वंदना बोकील-कुलकर्णी, पुणे

(१३) पं० वसंत गाडगीळ, पुणे

(१४) डॉ० केतकी मोडक, पुणे

(१५) श्री० सतीश आळेकर, पुणे

(१६) डॉ० अनिल सपकाळ, पुणे

(१७) श्री० मुकुंद वासुदेव गोखले, पुणे

■

# १. अद्ययावत मराठी शब्दकोशाबाबत

अनघा भट-बेहेरे

संदर्भ : 'भाषा आणि जीवन' उन्हाळा २०१२ (वर्ष ३० अंक २)मधील कोल्हटकर यांचा अनघा भट यांच्या 'अद्ययावत मराठी शब्दकोशाची निकड' ('भाषा आणि जीवन' हिवाळा २०१२ वर्ष ३० अंक १) या लेखाबद्दल दिलेला प्रतिसाद.

(१) 'गुप्तचर' हा शब्द मराठी शब्दकोशात नाही. ह्या शब्दाची नोंद नाम म्हणूनही नाही अथवा विशेषण म्हणूनही नाही, ही बाब कोल्हटकर यांनीसुद्धा नमूद केली आहेच. 'गुप्तचर' हा शब्द मराठीत कशा तऱ्हेने वापरला जातो हे दाखवण्याकरता मी 'तुझे गुप्तचर येऊनि नच का वार्ता ही सांगती' व 'गुप्तचर संस्था' ही उदाहरणे दिली आहेत. पैकी पहिल्या उदाहरणात 'गुप्तचर' हा शब्द नाम म्हणून आला आहे. 'गुप्तचर' शब्दाचा नाम म्हणून वापर मराठी भाषेत सांप्रत काळी अगदीच मर्यादित स्वरूपात आढळून येतो. 'गुप्तचर'पेक्षा 'गुप्तहेर' हा शब्द आजच्या मराठीत नाम म्हणून अधिक प्रचलित आहे. दुसऱ्या उदाहरणात (गुप्तचर संस्था) 'गुप्तचर' हा शब्द विशेषण मानावा असे मी सुचविले आहे. 'गुप्तचर' हा संस्कृत शब्द मानून त्याचे संस्कृतच्या आधारे विश्लेषण केल्यास 'गुप्तचर संस्था' म्हणजे गुप्तपणे हिंडणारी संस्था असा अर्थ होईल. परंतु 'गुप्तचर' ह्या शब्दाच्या मराठीत होणाऱ्या वापराच्या आधारे विश्लेषण करायचे म्हटले तर वेगळा विचार करावा लागेल. नाम आणि विशेषण अशा दोन्ही प्रकारे वापरले जाणारे आणखीही काही शब्दप्रयोग पाहू. जसे - (१) दहशतवादी : (अ) दहशतवाद्यांना कंठस्नान (आ) दहशतवादी कारवाया; (२) दलित : (अ) दलितांचे आत्मभान (आ) दलित साहित्य

यातील दहशतवादी कारवाया किंवा दलित साहित्य यांसारख्या शब्दसमूहांचा विचार कशा प्रकारे करायचा? किंवा 'गुप्तचर संस्था' हा सामासिक शब्द मानायचा का? की इंग्रजीतल्या 'मिक्सर ग्राइंडर'सारखे हे दोन नामांच्या सहयोगाने बनलेले जोड शब्द आहेत असे मानायचे? शब्दांचे हे वापर शब्दकोशांनी नोंदवायचे की नाही?

(२) शब्दांचे विविध व्याकरणिक गटांमध्ये विभाजन (जसे नाम, विशेषण, क्रियाविशेषण इत्यादी) कायमस्वरूपी व अपरिवर्तनीय नसते. शब्दांचा प्रत्यक्ष वापर होताना ह्या सर्व मर्यादा ओलांडल्या जातात. शब्दांना विविध व्याकरणिक गटात विभागणाऱ्या रेषा पुसट होत जातात. असे प्रयोग रूढ झाले की त्या शब्दांचा समावेश नव्या

गटात करावा लागते. हा मुद्दा स्पष्ट करताना मी विशेषणांचा विध्यर्थी वापर व त्यांचे क्रियाविशेषणात हळूहळू होणारे रूपांतर दाखवण्यासाठी काही उदाहरणे दिली होती. कोल्हटकर यांनी ती प्रतिसादात पुन्हा उदधृत केल्याने मी द्विरुक्ती टाळते. परंतु 'अस्पष्ट अक्षर' व 'मला अस्पष्ट दिसते'; आणि 'अथक प्रयत्न' व 'प्रक्रिया अथक चाललेली आहे' ह्या दोन उपयोजनांमध्ये अस्पष्ट व अथक हे दोन शब्द विशेषण व क्रियाविशेषण ह्या दोन प्रकारे वापरले गेले आहेत यात कोणताही संदेह नाही. शब्दकोशांनी अशा प्रकारच्या शब्दांचे विवेचन देताना विशेषण व क्रियाविशेषण अशा दोनही प्रकारांचे उपयोजन देऊन तशी नोंद केली पाहिजे.

(३) 'शक्य' आणि 'कबूल' ह्या शब्दांची नोंद मराठी शब्दकोशांत विशेषणे म्हणून आढळते. परंतु गुणवाचक विशेषण म्हणून त्यांचा वापर मला तरी सापडला नाही. 'शक्य'च्या गुणवाचक वापराचे जे उदाहरण कोल्हटकर देतात ते गुणवाचक नसून विध्यर्थी वापराचेच आहे. 'शक्य ते सारे प्रयत्न करून झाल्यावर' हे वाक्य '(जे) शक्य (होते) ते सारे प्रयत्न करून झाल्यावर' असे आहे. 'ते' हे सर्वनाम आहे. गुणवाचक विशेषण हे सर्वनामासोबत नव्हे तर नामासोबतच येते. (पिवळा तो, हिरवी ती असे उपयोजन संभवत नाही. पिवळा शर्ट, हिरवी पिशवी मात्र रूढ उपयोजन आहे) 'शक्य अट'. 'शक्य परिस्थिती' अशा तऱ्हेचे गुणवाचक उपयोजन माझ्या आढळात नाही. जुन्या मराठीमध्ये असे उपयोजन प्रचलित होते का, याविषयी मला माहिती नाही.

(४) विशेषणे आणि नामे यांविषयीचे कोल्हटकरांचे विवेचन रास्तच आहे. इंग्रजीत तसेच जर्मन, रशियन यांसारख्या इंडो युरोपीय कुळातील भाषांमध्ये विशेषणाचे नामात रूपांतर होणे, ही अगदी सामान्य बाब आहे. मात्र लक्षात घेण्याची गोष्ट अशी, की शब्दकोश ह्या शब्दांच्या नाम म्हणून व विशेषण म्हणून वापराची उदाहरणे नोंदवतात आणि त्यांची नाम व विशेषण अशी वेगवेगळाली नोंद देतात. मराठी शब्दकोशात मात्र अशा नोंदी आढळत नाहीत.

(५) 'रागावणे' हे क्रियापद अकर्मक असल्याबद्दलचे कोल्हटकरांचे विवेचन रास्तच आहे. परंतु मूळ मुद्दा 'रागावणे' ह्या क्रियापदाचा सध्या प्रचलित असलेला 'टू स्कोल्ड' हा अर्थच मराठी शब्दकोशांनी न देणे हा आहे. मराठी शब्दकोशात न आलेला हा अर्थ रमेश धोंगडे संपादित इंग्रजी मराठी शब्दकोशात ('इंग्रजी मराठी शब्दकोश', ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, नवीन आवृत्ती २००३) मात्र ह्या 'टू स्कोल्ड' इंग्रजी क्रियापदाचा अर्थ म्हणून दिलेला आहे.

(६) 'ऊन' कृदन्त व क्रियापदे यांविषयी माझे दोन विस्तृत लेख 'भाषा आणि जीवन' च्या दोन अंकांत प्रकाशित झाले आहेत. त्यामुळे पुन्हा भर देत नाही. परंतु पूर्ण

क्रियाव्याप्तीचा निर्देश करणाऱ्या क्रियापदांचा तो अर्थ नोंदला गेला पाहिजे, असे वाटते.

सरते शेवटी कोल्हटकर यांनी त्यांच्या टिपणात व्यक्त केलेल्या 'अद्ययावत मराठी इंग्रजी कोश निर्मितीकडे मी वळावे' ह्या त्यांच्या सूचनेबद्दल मी त्यांची आभारी आहे. ही जबाबदारी फारच मोठी आहे व ती पेलणे माझ्या कुवतीच्या बाहेरचे आहे. मराठी शब्दकोशांतील त्रुटी दाखवताना केवळ दोषदिग्दर्शन करणे इतकाच माझा हेतू नव्हता तर त्या निमित्ताने मराठी भाषाप्रेमींमध्ये काही चर्चा सुरू झाली तर कोशनिर्मितीला ती उपकारक ठरेल असे मला वाटले. कोल्हटकरांच्या प्रतिसादावर पुन्हा इतके विस्ताराने लिहिण्याचे कारणही तेच आहे. मराठी अभ्यास परिषद व 'भाषा आणि जीवन' ही परिषदेची पत्रिका यांच्या माध्यमातून संबंधित तज्ज्ञापर्यंत पोचणे शक्य आहे, असा मला विश्वास आहे. ह्या सर्वांच्या पुढाकारातून अद्ययावत कोशनिर्मिती मराठीत होईल, याविषयीची मला मुळीच शंका नाही.

मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा म्हणून धडपड करायची आणि तिच्या संवर्धनासाठी आवश्यक असणाऱ्या कोशनिर्मितीसारख्या प्रकल्पांकडे पुरेशा गांभीर्याने पाहायचे नाही, हे आम्हां मराठी भाषकांना फारसे शोभादायक नाही, यासाठी हा प्रपंच.

३, बसंत बहार, ११९/२, प्रभात रस्ता, पुणे 411 004.

■

## २. अठरा विसा

**शे० दे० पसारकर**

संदर्भ : भाषा आणि जीवन (उन्हाळा, २०१२) ओम देशमुख

वरील प्रतिसादातील १२ × ३० = ३६० हे पटण्याजोगे असले तरी मूळ विधानात १८ हा संख्यावाचक शब्द आहे. म्हणून अठरा विसा हवे. अन्यथा 'बारा तिसा' असा शब्दप्रयोग झाला नसता काय?

'उषास्वप्न', १२६-ब, मार्कंडेयनगर, सोलापूर 413 003.

■





अनुक्रमणिका

# अनौपचारिक गप्पा

मराठी साहित्य परिषद (आंध्र प्रदेश) या संस्थेच्या कार्यवाह डॉ० विद्या देवधर यांच्याशी अनौपचारिक गप्पांचा कार्यक्रम मराठी अभ्यास परिषदेतर्फे २१ मे २०१२ला फर्ग्युसन महाविद्यालयात आयोजित केला होता. या गप्पांच्या निमित्ताने डॉ० देवधर यांनी हैदराबाद येथील बहुसांस्कृतिक वातावरण, हैदराबाद येथील मराठी महाविद्यालय व 'पंचधारा' त्रैमासिक यांचे मराठी भाषेविषयीचे कार्य, तसेच त्यांच्या संस्थेने धडाडीने पूर्णत्वास नेलेले बृहद् प्रकल्प (उदाहरणार्थ, सेतुमाधवराव पगडी यांच्या समग्र वाङ्मयाचे आठ खंड) या विषयीच्या अनेक आठवणी सांगितल्या.

महाराष्ट्राबाहेर राहून मराठीचे संवर्धन करण्याच्या कामात येणाऱ्या अनेक आव्हानांची कल्पना त्यातून श्रोत्यांना आली. जाणकार श्रोत्यांच्या उपस्थितीत प्रश्नोत्तर रूपात गप्पा सहज रंगल्या.

■

### वा०ल० कुळकर्णी यांची अभ्यासू दृष्टी : २

वा०ल० कुलकर्णी यांनी लिहिलेले लेखकांवरील ग्रंथ असतील किंवा नियतकालिकांवरील ग्रंथ असतील किंवा त्यांनी तयार केलेले इतर समीक्षापर लेखन असेल, ते सारेच पाहताना ज्ञानाचे क्षेत्रांतील व्यवहार खुलेपणाने; पण काटेकोरपणे व्हावे, असे त्यांना वाटत होते, हे स्पष्ट होते. ज्ञानाच्या क्षेत्रात भक्तिपरंपरेला फारसा अर्थ नसतो, असे त्यांचे ठाम मत होते. म्हणूनच मूल्यमापन, पुनर्मूल्यमापन, शोध, पुनर्शोध यांमधूनच ज्ञानक्षेत्राचा विकास होतो, यावर त्यांचा विश्वास होता. खऱ्या ज्ञानव्यवहाराची कास धरणारे आणि त्यासाठी प्रसंगी कटुता स्वीकारणारे हे व्यक्तिमत्त्व होते आणि त्यामुळेच त्यांच्या समीक्षेने मराठीमध्ये अनेक नव्या गोष्टी आणल्या हे निर्विवादच आहे. ■

[डॉ० नागनाथ कोत्तापल्ले, 'अक्षर वाङ्मय', जानेवारी-मार्च २०१२, पृ० १२३]





अनुक्रमणिका

## शास्त्रीय परिभाषा

प्रत्येक शब्दाचा पूर्ण अर्थ त्याच्या अंगोपांगातून निघालाच पाहिजे हा अट्टहास अशास्त्रीय आहे. शब्दाभोवती हळूहळू अर्थाच्या छाया-पडछाया गोळा होतात. ढोबळ मानाने अर्थ सुचवणारा शब्द एकदा भाषेत रुळला की संकल्पित अर्थ पूर्णपणे दाखवील. परिभाषेला लोकभाषेची पाठराखणी न मिळाल्यास हेकट पांडित्याच्या जाचाखाली ती सुकून जाईल. चपल, चलाख व सुटसुटीत परिभाषेचा एकदा वापर सुरू झाला की आपोआपच मराठी शास्त्रीय वाङ्मय समृद्ध होईल. नाहीतर ते पोटफुगे व खुरटे होऊन लेखक व जुळारी यांच्याखेरीज कोणी वाचणार नाही! मग त्याला संस्थां(नां)कडून उत्तेजनार्थ कितीही 'प्रैजे' मिळोत.

संस्कृतोत्पन्न इतर देशी भाषांशी सांधा जुळवण्यासाठी संस्कृत शब्द हवेत असे कारण पुढे केले जाईल, पण हे कारण दुबळे आहे. हिंदुस्थानातील अनेक मातबर भाषा संस्कृतशी काहीच लागाबांधा नसलेल्या आहेत. आणि संस्कृतोत्पन्न इतर भाषांना तरी आपला पुळका मानवेल का? संस्कृतोत्पन्न म्हणजे संस्कृत नव्हे. एकाच भाषेपासून निघालेल्या या अनेक भाषा आपापले स्वतंत्र मार्ग शतकानुशतके चोखाळीत गेल्या; त्यांची इतर भाषांशी घसट झाली; राजकीय व भौगोलिक कारणांनी त्यांच्या स्वरूपात बदल होत गेले - आणि आता खापरपणजीचे नाते सांगून आपल्या परिभाषेचा बोजा त्यांच्या ओट्यावर बळेबळेच टाकून काय उपयोग? संस्कृतोत्पन्न भाषांसाठी सर्वसाधारण परिभाषा घडवण्याच्या प्रयत्नांत ह्यात असलेल्या पन्नास भाषांशिवाय आणखी एकावन्नावी तयार होईल व ती कोणालाच समजणार नाही - फक्त परिभाषा-कोशात तिचे लोणचे मुरत राहील!!

'वादसंवाद' : मं०वि० राजाध्यक्ष, द०ग० गोडसे,
(संपा० ग०रा० कामत, मीना गोखले, मौज प्रकाशन, मुंबई. २००६)

## लेखक-परिचय


- **काटीकर, आनंद :** एम०ए०(मराठी), औषध निर्माणशास्त्राची पदविका, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे अध्यापन.
  टपाल-पत्ता : एफ-301, रिव्हर व्ह्यू रेसिडेन्सी, 12/1/1 वडगाव बुद्रुक, सन सिटी रस्ता, आनंदनगर, पुणे 411051. ई-पत्ता : anand.katikar@gmail.com
  स्थिरभाष : (020) 2535 6609; चलभाष : 094216 10704

- **कोल्हटकर, माधवी :** संस्कृतमध्ये पीएच०डी०, संपादक, संस्कृत कोश विभाग. पाली, जर्मन, रशियन या भाषांशी तोंडओळख. 'सिबिल'चा मराठी अनुवाद, 'सुरा, द लिकर अँड द वेदिक सॅक्रिफाइस' व 'एन्शन्ट इंडियन फायर रिच्युअल' आदी आठ पुस्तके प्रकाशित. अनेक शोधनिबंध प्रकाशित.
  टपाल-पत्ता : 885/3, भांडारकर मार्ग, सहावी गल्ली, पुणे 411004.
  ई-पत्ता : mkolhatk@yahoo.com
  स्थिरभाष : (020) 2565 3669; चलभाष : 97673 56127

- **देशपांडे, ब्रह्मानंद :** एम०ए०, पीएच०डी०, डी०लिट. महामहोपाध्याय, विद्याभूषण आदी सन्मान प्राप्त. प्राचीन मराठी वाङ्मय, शिलालेख आदींचे व्यासंगी संशोधक, 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' आदी पुस्तके प्रकाशित.
  टपाल-पत्ता : C-C09 कुणाल रेग्युलस, बालेवाडी, पुणे 411045.
  स्थिरभाष : (020) 2551 0756; चलभाष : 09923390614

- **पाटील, शिवाजी विष्णू :** एम०ए०, पीएच०डी० सातारा येथील महाविद्यालयात मराठीचे प्रपाठक.
  टपाल-पत्ता : विभाग प्रमुख, पदवी व पदव्युत्तर मराठी विभाग, छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा 415001.
  स्थिरभाष : (020) 02162 222391

- **फडके, रंजना :** एम०ए०,पीएच०डी०, वाडिया महाविद्यालयात मराठीचे अध्यापन, तीन काव्यसंग्रह प्रकाशित. पैकी दोन संग्रह ब्रेल लिपीत प्रकाशित. 'जीवनक्षण' काव्यसंग्रहाला गदिमा पुरस्कार, 'स्त्री-साहित्याचा मागोवा'मध्ये लेखन. साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या कार्यवाह.
  टपाल-पत्ता : 'सायली', श्रीरंग हाउसिंग सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.
  स्थिरभाष : (020) 2421 0985; चलभाष : 093710 91442






अनुक्रमणिका

■ **बापट, नीलकंठ :** गेली पन्नास वर्षे अध्ययन, अध्यापन व संशोधन यांत कार्यरत, शिक्षण पुणे व क्लिवलँड, यु०एस०ए० येथे. डॉ० बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथे विभागप्रमुख. निवृत्तीनंतर खॉनकेन, थायलंड येथे प्राध्यापक म्हणून काम केले.
टपाल-पत्ता : 74 भाग्यनगर, औरंगाबाद, 431 001.
स्थिरभाष : (0240) 2331 620, चलभाष : 093256 13936;
ई-पत्ता : bapatng@sancharnet.in

■ **मोरे, नंदकुमार :** एम०ए०,पीएच०डी०, नेट, 'मराठी कादंबरीची समाजभाषा-वैज्ञानिक चिकित्सा' या विषयावर प्रबंध 'समीक्षा पद्धती : सिद्धांत आणि उपयोजन' या पुस्तकाचे संपादन. साहाय्यक प्राध्यापक, वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर.
टपाल-पत्ता : मु०पो० हलकर्णी, ता० चंदगड, जि० कोल्हापूर 416 552.
चलभाष : 094226 28300; ई-पत्ता : nandkumarmore@ymail.com

■ **शहा, मृणालिनी :** मॉडर्न महाविद्यालय, गणेशखिंड, पुणे येथून निवृत्त प्रपाठक, काही काळ पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात अध्यापन, 'माझा प्रवास'चे संपादन, 'स्त्री सुधारणाविषयक नाट्यलेखन' आदी दहा पुस्तके प्रकाशित.
टपाल-पत्ता : 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.
स्थिरभाष : (020) 2543 3869.

■ **शिंदे, अरुण कृष्णा :** साहाय्यक प्राध्यापक, मराठी विभाग, नाइट कॉलेज ऑफ आर्ट्स अँड कॉमर्स, कोल्हापूर. 'सत्यशोधक चळवळीच्या नियतकालिकांचा वाङ्मयीन अभ्यास' या विषयावर शिवाजी विद्यापीठाची पीएच०डी०, अनेक शोधनिबंधांचे लेखन. 'मुकुंद पाटील यांच्या कथा' हा ग्रंथ प्रकाशित.
चलभाष : 094210 24055.

■ **शेणई, संतोष :** 'सकाळ'मध्ये संपादकीय विभागात कार्यरत. मराठवाडा मित्रमंडळ महाविद्यालयाच्या वृत्तपत्रविद्या विभागात मानद संचालक, मालवणी बोली व लोकसंस्कृती याविषयी अभ्यास. 'घटकापळाने' हा काव्यसंग्रह प्रकाशित.
टपाल-पत्ता : फ्लॅट क्र० 3, सुंदररचना, विठ्ठलनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.
स्थिरभाष : (020) 2434 9466; चलभाष : 98810 99016

Book Packet, containing Periodical

बुकपोस्ट-बुकपॅकेट-त्रैमासिक
R.N.I. नोंदणी क्रमांक : Q-40048/83
ISSN 2231 - 4059 Marathi Abhyas Parishad Patrika



मराठी अभ्यास परिषद : वर्धापनदिन' समारंभ २०१२च्या निमित्तानं आयोजित केलेल्या, 'मराठी ही अभिजात भाषा · काय?' ह्या विषयावरील परिसंवादात डॉ० ब्रह्मानंद देशपांडे विचार मांडताना. शेजारी (डावीकडून उजवीकडे) डॉ० कल काळे, प्रा० प्र० ना० परांजपे व प्रा० हरी नरके.

मराठी अभ्यास परिषद



प्रेषक :
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
1 शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.
चलभाष : 94216 10704